मुलांसाठीं सचित्र

# भारतांतील गोष्टी

भाग पहिला.

आवृत्ति पहिली.

१९१४.

किंमत पांच आणे

मुलांसाठीं

# भारतांतील गोष्टी.

## पहिले दोन शब्द.

मुलांनो, वाचलें ना तुम्हीं ' चिमुकलें भारत ' ? काय ? तें वाचून आम्हांला फार आनंद वाटला व बोधही चांगला मिळाला, असें म्हणतां तुम्ही ? ठीक आहे. आनंदाची गोष्ट आहे. तुम्हांला आनंद झाला, हें ऐकून मला मोठें समाधान वाटतें. अशींच मनापासून तुम्ही चांगलीं चांगलीं पुस्तकें नेहमीं वाचाल, तर तुम्ही पुढें थोर माणसें व्हाल, यांत शंका नाहीं.

असो. ' चिमुकलें भारत ' या पुस्तकांत कौरव व पांडव यांची हकीकत तुम्हांला सांगि-

तली. महाभारतांत मुख्य कथा तीच आहे; पण मुख्य कथेच्या ओघांत दुसऱ्या अनेक गोष्टी महाभारतांत आलेल्या आहेत. कौरव व पांडव यांच्या कथेशीं त्यांचा फारसा संबंध नसल्यामुळें त्या चिमुकल्या भारतांत सांगितल्या नाहींत. या कथांना उपकथा ( मुख्य नाहींत अशा कथा ) असें नांव आहे. या कथा जरी भारतांत मुख्य नव्हत, तरी त्या योग्यतेनें कांहीं कमी नाहींत. त्यांपासून मनाची चांगली करमणूक होते, व उत्तम बोधही मिळतो तेव्हां अशा त्या गोड कथा या पुस्तकांत सांगाव्या, असा माझा विचार आहे. हें पुस्तकही तुम्ही लक्ष लावून वाचा, म्हणजे तुमचा पुष्कळ फायदा होईल. वा ! तुम्ही तर अगदीं उतावळीं झालेलीं दिसतां ! ठीक आहे. तर मग मीही आतां त्या गोष्टी सांगण्याला एकदम आरंभ करितों.



# तीन शिष्य.

मुलांनो, हल्लीं आपल्या देशांत विद्या शिकविण्याकरितां जिकडे तिकडे शाळा झाल्या आहेत. ठराविक पैसे दिले कीं तिथे विद्या शिकवितात. पण असें पूर्वीं नव्हतें. विद्या शिकण्याकरितां पूर्वीं गुरूच्या घरीं जाऊन त्याची सेवा करावी लागे. निर्मळ वर्तन ठेवावें, गुरूच्या अगदीं आज्ञेंत राहावें, गुरूचें पडेल तें काम करावें, तेव्हां गुरूचें मन संतुष्ट होऊन तो शिष्याला प्रेमानें सर्व विद्या शिकवी. **गुरु केवळ प्रेमानें जी विद्या शिकवितो, तिची योग्यता मोठीच आहे.** पण गुरूचा लोभ बसवून घेण्याला शिष्याना त्या काळीं कष्टही तसेच करावे लागत. **मनुष्य परीक्षेला उतरल्याशिवाय त्याच्यावर कोणीही खरें प्रेम करीत नाहीं.** त्याप्रमाणें पूर्वींचे गुरुही आपल्या शिष्यांची परीक्षा पाहात असत. आणि शिष्यांची आपल्यावर खरी भक्ति आहे, अशी एकदां गुरूची खात्री झाली

कीं, मग तो त्याला पूर्ण ज्ञान देऊन त्याचें कल्याण करी. गुरूच्या घरीं शिष्यांना सर्व कामें करावीं लागत, यामुळें त्या काळचे शिष्य नुसते पुस्तकी पंडित नसत; तर ते संसारी कामांत हुशार व आचरणानें निर्मळ निपजत. असो.

पूर्वी **धौम्य** या नांवाचे मोठे ऋषि होते. **आरुणी**, उपमन्यु व **वेद** या नांवाचे तीन शिष्य विद्या शिकण्याकरितां त्यांचेजवळ होते. एकदां ते **आरुणी**ला म्हणाले, बाळा **आरुणी**, जा आणि शेताला बांध घालून पाणी अडवून ठेव. या गुरूच्या आज्ञेप्रमाणें शेतांत जाऊन **आरुणी** बांध घालूं लागला; पण त्याला कांहीं केल्या पाणी आटपेना; तेव्हां तो विचारांत पडला. **गुरूंच्या आज्ञेप्रमाणें काम न करितां त्यांस तोंड दाखविणें खऱ्या शिष्यास शोभत नाहीं,** असा विचार ठरवून तो बांधाच्या ठिकाणीं स्वतांच आडवा पडला, व त्यानें आपल्या शरीरानें पाणी अडवून धरलें! इकडे बराच वेळ झाला, तरी **आरुणी** परत येत नाहीं, असें पाहून **धौम्य**गुरु त्याला शोधण्याकरितां आपल्या

शिष्यांसह तेथें आले; व 'वत्सा, कोठें आहेस? इकडे ये,' अशा त्यास हाका मारूं लागले. गुरूची 'इकडे ये' अशी आज्ञा ऐकतांच शेताचा बांध फोडून आरुणी बाहेर आला, व त्यानें गुरूस नमस्कार केला. झालेली सगळी हकीकत त्यानें अगदीं नम्रपणानें आपल्या गुरूला सांगितली. तेव्हां धौम्य म्हणाले, आजपासून तुला उद्दालक म्हणजे 'बांध फोडून उठणारा' असें नांव प्राप्त होईल. तसेंच माझी आज्ञा तूं निश्चयानें पाळलीस, यामुळें तुझें निरंतर कल्याण होईल, व वेद व धर्मशास्त्रें तुला लवकर प्राप्त होतील. याप्रमाणें गुरूच्या आशीर्वादानें उत्तम विद्या प्राप्त झाल्यावर तो आनंदानें आपल्या घरीं निघून गेला.

पुढें धौम्यांनीं आपल्या उपमन्यु शिष्यास आपल्या गाई राखण्याचें काम सांगितलें. गुरूच्या आज्ञेप्रमाणें दिवसभर वनांत गाई चारून संध्याकाळीं तो आश्रमांत परत येत असे. एके दिवशीं नित्यनेमाप्रमाणें गुरूपुढें येऊन त्यानें त्यांना नमस्कार केला; तेव्हां तो पहिल्यासारखाच टव-

टवीत आहे, असें पाहून धौम्यांनीं त्याला विचारलें, वत्सा, तूं राहतोस कशावर? यावर, मी भिक्षेवर राहतों, असें उपमन्यूनें उत्तर केलें. तेव्हां धौम्य म्हणाले, भिक्षेचें अन्न प्रथम गुरूला दिल्याशिवाय शिष्यानें खाऊं नये. बरें, असें म्हणून दुसऱ्या दिवशीं त्यानें भिक्षेचें अन्न गुरू-पुढें आणून ठेविलें. गुरूंनीं तें सगळेंच खाऊन टाकलें, शिष्यास कांहींच त्यांतलें दिलें नाहीं. असें रोज होऊं लागलें. तरी वनांत जाऊन गाई राखण्याचें त्याचें काम चाललेंच होतें. कांहीं दिवसांनीं होता तसाच तो गुटगुटीत आहे, असें पाहून धौम्य त्याला म्हणाले, बाळा, हल्लीं तूं कशावर राहतोस? तेव्हां तो म्हणाला, महाराज, पहिली भिक्षा आपणांस देऊन पुन्हा मी दुसरी मागतों व ती खातों. यावर, असें करूं नये, तेणेंकरून लोकांना त्रास होतो, असें धौम्यांनीं सांगितलें. उपमन्यु, बरें, असें म्हणून निघून गेला. कांहीं दिवसांनीं धौम्यांनीं त्याला तोच प्रश्न पुन्हा केला. तेव्हां उपमन्यूनें सांगितलें कीं, मी गाईचें दूध पिऊन राहतों. माझ्या आज्ञे-

शिवाय तूं दूध पितोस, हें योग्य नाहीं, असें पुन्हा करूं नको, असें यावर धौम्य म्हणाले. आतां पिणार नाहीं, असें कबूल करून उपमन्यु तेथून गेला. पुढें, तो आपला पूर्वीसारखाच धडधाकड आहे, असें पाहून गुरूंनीं त्याला फिरून तोच प्रश्न केला. तेव्हां उपमन्यूनें उत्तर केलें, वासरें पीत असतांना त्यांच्या तोंडांतून जो फेंस बाहेर पडतो, त्यावर मी राहतों. त्यांच्या अन्नांत अशा रीतीनें वांटेकरी होणें तुला शोभत नाहीं, असें यावर धौम्यांनीं म्हटलें. गुरूंची ही आज्ञा त्यानें मान्य केली. पुढें रानांत गुरांमागून फिरतां फिरतां तो भुकेनें अगदीं व्याकुळ झाला; तेव्हां कांहीं उपाय नाहीं, असें पाहून रुईचीं पानें त्यानें खाल्लीं. पण त्यांमुळें त्याचे डोळे जाऊन तो आंधळा झाला! नंतर चांचपडत चांचपडत रानांतून चालला असतां तो एकदम एका विहिरींत पडला. इकडे सूर्य मावळून रात्र पडली तरी उपमन्यु परत आला नाहीं, असें पाहून धौम्य आपल्या इतर शिष्यांना बरोबर घेऊन वनांत त्याचा शोध करूं लागले. त्यांनीं

त्याला हाका मारल्या; तेव्हां विहिरींतून त्यानें उत्तर दिलें. मग धौम्य तेथें आल्यावर त्यानें त्यांस सर्व हकीकत सांगितली. ती ऐकून त्याच्या भक्तीनें धौम्यांना मोठा संतोष वाटला. त्यांनीं त्याचे डोळे त्याला परत दिले व त्याला सर्व विद्या शिकविल्या.

तिसरा शिष्य वेद याचीही धौम्यांनीं अशीच अगदीं कसून परीक्षा घेतली. त्यास ते बैलाप्रमाणें गाडीही ओढायला लावीत! पण थंडी, ऊन, तहान, भूक यांच्या दुःखांना न जुमानतां त्यानें आपल्या गुरुजींची सेवा अगदीं निष्ठेनें केली! **गुरूची सेवा कधीं फुकट जात नाहीं; तिनें शेवटीं शिष्याचें कल्याणच होतें.** तसेंच वेदाचें कल्याण झालें. त्याच्या भक्तीनें संतुष्ट होऊन गुरूंनीं त्याला सर्व विद्यांत हुषार केलें. मग तो आपल्या घरीं गेला.



# च्यवनाचा जन्म.



पूर्वी भृगु या नांवाचे एक ऋषि होते. त्यांच्या बायकोचें नांव पुलोमा. ही पुलोमा पुलोम नांवाच्या एका राक्षसास द्यावयाची, असें पहिल्यानें ठरलें होतें. पण पुढें तिला तिच्या बापानें भृगुऋषींस दिलें. त्यामुळें पुलोम सारखा संतापानें व मत्सरानें जळत होता. कांहीं काळानें पुलोमा गर्भार राहिली. एके दिवशीं असें झालें कीं, ऋषि स्नानास गेले असतां ती संधी साधून पुलोम त्यांच्या आश्रमांत आला. कोणीही पाहुणा घरीं आला असतां त्याचा उत्तम आदरसत्कार करणें हें आपलें गृहस्थाचें कर्तव्य आहे. त्याप्रमाणें पुलोम आश्रमांत आलेला पाहून रानांतील फळें व मुळें देऊन पुलोमेनें त्याचा सत्कार केला. तिनें आपला धर्म पाळण्याकरितां त्याचा सत्कार केला खरा, पण पुलोमाचें मन कुठे तसें पवित्र होतें! तिचा पाहुणचार घेऊन तिलाच उपटून घेऊन जाण्याचा त्यानें बेत

केला. व त्याप्रमाणें तो तिला घेऊन जाऊं लागला. पण आपल्या आईचा होत असलेला हा छळ पुलोमेच्या पोटांतील पुत्रास सहन झाला नाहीं. तो रागाच्या भरांत एकदम तिच्या पोटांतून बाहेर पडला ! आईच्या पोटांतून अशा रीतीनें तो च्युत झाला, म्हणजे अकस्मात् गळून पडला, म्हणून त्याचें नांव च्यवन असें पडलें. या च्यवनाच्या सूर्यासारख्या नुसत्या तेजानेंच पुलोमाचें जळून भस्म झालें. पुलोमा या आपल्या पुत्राला घेऊन आश्रमांत परत आली.

---

## रुरु व प्रमद्वरा.

पूर्वी विश्वावसु या नांवाचा एक गंधर्वांचा राजा होता. त्याला मेनकेच्या पोटीं एक कन्या झाली. पण ती त्या निर्दय अप्सरेनें स्थूलकेश या नांवाच्या एका ऋषीच्या आश्रमाजवळ नदीकांठीं टाकून दिली ! ऋषींच्या दृष्टीस जेव्हां ती

सुंदर मुलगी पडली, तेव्हां त्यांना तिची दया येऊन त्यांनीं तिला आपल्या आश्रमांत नेलें; व पोटच्या मुलीप्रमाणें त्यांनीं तिला मोठ्या प्रेमानें वाढविलें. ती मुलगी सर्व प्रमदांमध्यें म्हणजे तरुण स्त्रियांमध्यें वरा म्हणजे श्रेष्ठ असल्यामुळें, तिचें प्रमद्वरा असें योग्य नांव त्यांनीं ठेविलें. पुढें रुरु या नांवाच्या एका ब्राह्मणाचें तिजवर मन बसून त्यानें ऋषींजवळ तिजबद्दल मागणी घातली. व ऋषींनीं ती मागणी कबूलही केली. पण शास्त्रोक्त विवाह होण्यापूर्वीं एके दिवशीं प्रमद्वरा आपल्या मैत्रिणींसह रानांत खेळत असतां तिचा पाय एका सापावर पडून तो साप तिला तत्काळ चावला. त्याबरोबर ती पांढरीफटफटीत पडून व मेल्यासारखी होऊन जमिनीवर पडली. तेव्हां रुरु व इतर आश्रमांतील मंडळी तेथें येऊन पुष्कळ शोक करूं लागली. रुरु तर दुःखानें वेडा होऊन अरण्यांत भटकूं लागला. पुढें त्याला एक देव-दूत भेटून त्यानें सांगितलें कीं, तूं आपलें अर्धें आयुष्य जर प्रमद्वरेला देशील, तर ती पुन्हा जिवंत होईल. त्याप्रमाणें आपलें अर्धें आयुष्य

दिल्याचा रुरूनें मनांत संकल्प करितांच प्रमद्वरा झोंपेंतून जागी झाल्याप्रमाणें उठून बसली ! पुढें चांगल्या मुहुर्तावर दोघांचें लग्न झालें, व तीं आनंदानें संसार करूं लागलीं. पण आपल्या आवडत्या बायकोवर एका सापामुळें आलेला प्रसंग रुरु विसरला नाहीं. यामुळें सांपडेल तेथें साप मारावयाचा, असा त्यानें निश्चय केला. असें त्याचें व्रत चाललें असतां एके दिवशीं अरण्यांत त्याला एक म्हातारा साप दिसला व आपल्या नियमाप्रमाणें रुरूनें त्याजवर आपली काठी उगारली. तेव्हां तो साप म्हणाला, मी विषारी साप नाहीं. मी निरुपद्रवी आहें. मला विनाकारण कां मारतोस ? हें त्याचें भाषण ऐकून हा कोणी तरी सापाचें रूप पावलेला ऋषि असावा, खरा साप नसावा, असा विचार करून रुरु म्हणाला, तुला हें सापाचें रूप कसें प्राप्त झालें ? यावर सापानें उत्तर केलें, मी पूर्वीं ऋषि होतों. माझें नांव सहस्रपात्. माझा एक खगम नांवाचा जिवलग स्नेही होता. तो धार्मिक कर्मांत गढून गेला असतां गवताच्या काड्यांचा एक साप करून मीं

त्याच्या अंगावर एकदम टाकला. तो बेसावध असल्यामुळें या खोट्या सापास भिऊन बेशुद्ध पडला ! पुढें शुद्धीवर आल्यावर रागाच्या भरांत त्यानें मला असा शाप दिला कीं, तूं साप होऊन अरण्यांत भटकशील. तेव्हां मीं त्याची क्षमा मागून म्हटलें, मीं ही केवळ तुझी थट्टा केली; यांत माझा कांहीं वाईट हेतु नव्हता. मग माझ्या मित्राला माझी दया येऊन तो म्हणाला, रुरूचें दर्शन झालें, म्हणजे तुझें पहिलें रूप तुला प्राप्त होईल. एवढें बोलल्यावर सापाचें रूप जाऊन त्याला पहिलें ऋषीचें रूप प्राप्त झालें. मग तो रुरूला म्हणाला, हिंसा करणें हा क्षत्रियाचा धर्म आहे. ब्राह्मणाला तें कर्म योग्य नव्हे. पूर्वीं जनमेजयानें सर्पसत्र केलें; त्या वेळीं आस्तिक नांवाच्या एका ब्राह्मणानें कांहीं नागांना वांचविलें. त्यांची प्रजा सध्यां नांदत आहे. तेव्हां हें हिंसेचें व्रत सोडून दे. **नेहमीं खरें बोलणें, क्षमा धरणें व वेदांचा अभ्यास करणें, हा जसा ब्राह्मणांचा धर्म आहे; तसाच केव्हांही हिंसा न करणें हाही त्यांचा धर्म आहे.**

सहस्रपाताचें हें भाषण ऐकून रुरूनें त्यास जनमेजयाच्या सर्पसत्राची हकीकत विचारली. पण ती न सांगतांच तो ऋषि गुप्त झाला. नंतर आश्रमांत परत येऊन रुरूनें आपल्या बापालाच ती हकीकत विचारली. व त्यानें ती त्याला सर्व सांगितली.

---

## आस्तिकाचा जन्म.

जरत्कारु या नांवाचा एक ऋषि होता. जन्मांत लग्न करावयाचें नाहीं, असा निश्चय करून तो तीर्थयात्रा करीत हिंडत असे. पुढें त्याला कांहीं चमत्कारानें असें कळलें कीं, आपण लग्न करीत नाहीं, यामुळें आपला वंश खुंटून आपले सगळे पितर नरकांत जाणार. तेव्हां त्याला स्वतां संसाराची इच्छा अगदीं नव्हती, तरी केवळ पितरांना चांगली गति मिळून सुख व्हावें, म्हणून तो लग्न करण्यास

तयार झाला. तरी त्याच्या अशा अटी होत्या कीं, माझ्याच नांवाची मुलगी तिच्या भावानें मला भिक्षा म्हणून दिली, व तिच्या पोटाचें ओझें मजवर पडलें नाहीं, तर मी लग्न करीन; पण लग्न झाल्यावर जर ती केव्हांही मला न आवडणारी गोष्ट करील, तर मी तिला सोडून जाईन. पुढें सर्पांचा राजा वासुकि यानें आपली जरत्कारु याच नांवाची बहीण त्या ऋषीला दिली. आपल्या नवऱ्याची अट ठाऊक असल्यामुळें जरत्कारु त्याच्या मनाविरुद्ध कधींही वागत नसे. त्याची सेवा ती मोठ्या दक्षतेनें करी. पण **ईश्वरी नेमानेम कुठे चुकतो का ?** एकदां असें झालें कीं, जरत्कारु निजला असतां सूर्य अस्तास जाण्याचे बेतांत आला. तेव्हां, पतीला उठवावें तर त्याला राग येणार, बरें न उठवावें तर संध्येची वेळ टळल्यामुळें त्याला पाप लागणार, असा विचार त्याच्या बायकोला येऊन पडला. तथापि **पतीच्या रागापेक्षां त्याला लागणाऱ्या पापाचें तिला अधिक भय वाटून** तिनें त्याला उठविलें. यामुळें, तूं माझ्या मनाविरुद्ध वाग-

लीस, असें आपल्या बायकोस सांगून तो रागानें तिला सोडून गेला. तो गेला तेव्हां जरत्कारु गरोदर होती. कांहीं दिवसांनीं तिला मुलगा झाला. त्याचें नांव आस्तिक असें ठेविलें.

---

## समुद्रमंथनाची कथा.

मरण कोणालाच नको. पण तें कांहीं चुकत नाहीं. देवांनाही तें येतेंच. त्यांना आयुष्य पुष्कळ असतें, इतकेंच काय तें. एकदां असें झालें कीं, मरण कसें चुकेल, याचा विचार करण्याकरितां सगळ्या देवांची स्वर्गांत सभा भरली. तेव्हां श्रीविष्णूनें पुढें होऊन सांगितलें कीं, देव हो, तुम्ही समुद्राचें मंथन करा (म्हणजे समुद्र घुसळा), म्हणजे त्यापासून तुम्हांला अमृत मिळेल, व तें खाल्लें कीं, तुम्ही अमर व्हाल. तेव्हां देव मंथनाचे उद्योगास लागले. अमर होण्याच्या आशेनें दैत्यही त्यांच्या मदतीला आले. **सगळ्यांच्या**

हिताची गोष्ट आली कीं, आपसांतील भांडण विसरून ती करण्यास झटावें, हेंच योग्य आहे. तसेंच या वेळीं देव व राक्षस यांनीं केलें. असो. त्यांनीं मंदर पर्वताची रवी व वासुकि सर्पाची दोरी केली. या वेळीं श्रीविष्णूनें कूर्माचें(कासवाचें) रूप घेऊन आपल्या पाठीवर मंदर पर्वत सांवरून धरिला. कूर्म-अवतार तो हाच. देवांनीं वासुकीची शेंपटी धरली, व दैत्यांनीं त्याची तोंडाकडची बाजू धरली. नंतर मंथन सुरू झालें. तेव्हां समुद्रांतून चंद्र, लक्ष्मी, सुरा ( दारू ), उच्चैःश्रवा नांवाचा सुंदर पांढरा घोडा, कौस्तुभ मणि, पारिजात वृक्ष, सुरभि नांवाची कामधेनु ( जें इच्छावें तें देणारी गाय ), अशा वस्तु प्राप्त झाल्या. नंतर अमृत आंत असलेला पांढरा कमंडलु हातांत घेऊन धन्वंतरी बाहेर आला. पुढें ज्याला चार पांढरे सुळे आहेत असा ऐरावत नांवाचा हत्ती व हालाहल नांवाचें भयंकर विष उत्पन्न झालें. तें विष फार भयंकर होतें. तें बाहेर पडल्याबरोबर पृथ्वी जाळीत सुटलें. तेव्हां श्रीशंकरानें देवांच्या विनंतीवरून सगळ्या लोकांना

वांचविण्यांकरितां तें आपल्या कंठांत ठेवून दिलें. त्या विषानें त्याचा कंठ भाजून निळा झाला. म्हणून त्या वेळेपासून त्याला ' **नीलकंठ** ' असें नांव पडलें. एकंदर चवदा वस्तु त्यांना मिळाल्या. त्यांना चवदा रत्नें म्हणतात. असो. पुढें अमृताबद्दल देव व दैत्य यांचें भांडण जुंपलें. त्यांत दैत्यांनीं तें पात्र हिसकावून नेलें. तेव्हां श्रीविष्णूनें मोहिनीचें म्हणजे एका सुंदर स्त्रीचें रूप घेऊन दैत्यांजवळून तें अमृत मोठ्या युक्तीनें आणून देवांस वांटून दिलें. देव तें पीत असतां राहू नांवाचा दैत्य देवाचें रूप घेऊन त्यांच्यांत शिरला व अमृत पिऊं लागला. तें त्याचें कपट, सूर्य व चंद्र यांनीं देवांच्या हितासाठीं उघडकीस आणलें. तेव्हां राहूच्या तोंडांतलें अमृत त्याच्या गळ्याखालीं उतरण्यापूर्वीं श्रीविष्णूनें त्याचें शीर उडविलें. तें उडून आकाशांत गेलें. अमृतामुळें तेवढेंच अमर झालें. सूर्य व चंद्र यांनीं आपली चहाडी केली, म्हणून राहूनें त्यांच्यावर दांत धरला. व तो त्यांना पीडा देऊं लागला. ग्रहणाचे वेळीं तो त्यांना गिळतो म्हणतात. असो.

देवांनीं आपणांस शेवटीं फसविलें, असें पाहून दैत्यांनीं त्यांच्याशीं युद्ध मांडलें. पण त्यांत त्यांचा पराभव होऊन शेवटीं त्यांना पाताळांत पळावें लागलें. मनुष्यानें स्वस्थ बसूं नये, उद्योग करीत असावें, म्हणजे शेवटीं त्याला अमृतासारखें फळ प्राप्त होऊन सुख झाल्यावांचून राहणार नाहीं; व चांगला उद्योग करितो, त्याची पाठ श्रीविष्णु राखतो; असा या कथेपासून बोध निघतो.

---

# गरुड व त्याची आई.



कश्यप या नांवाचे एक ऋषि होते. त्यांना दोन बायका होत्या, कद्रु व विनता. या दोघी बहिणीच होत्या. कद्रूला एक हजार पुत्र झाले; व विनतेला दोनच झाले, अरुण व गरुड. अरुण हा सूर्याचा सारथि झाला. एकदां कद्रु व विनता या दोघींची एका गोष्टीबद्दल पैज पडली. जी हरेल, तिनें दुसरीची दासी व्हावें, असें त्या दोघींत ठरलें होतें. पुढें कद्रूनें कांहीं कपट करून

ती पैज जिंकली. तेव्हां विनता तिची दासी झाली. यामुळें कद्रु व तिचे पुत्र विनतेला व गरुडालाही हवे तसे हुकूम करीत. ही स्थिति पाहून गरुडाला फार वाईट वाटलें. **आई दुःखांत असतां जर तिचें दुःख दूर करण्याकरितां पुत्रानें प्रयत्न केला नाहीं, तर तो पुत्र कसला?** असा विचार त्याच्या मनांत आला. त्यानें आपल्या आईला दासीपणांतून सोडविण्याचा निश्चय केला. आम्हांला अमृत आणून देशील, तर आम्ही तुझ्या आईची सुटका करूं, असें कद्रूच्या मुलांनींही कबूल केलें. नंतर तो अमृत आणण्याकरितां इंद्रलोकीं गेला. तेथें गेल्यावर मोठ्या पराक्रमानें त्यानें सगळ्या देवांचा पराभव केला व अमृत प्राप्त करून घेतलें. अमृत मिळालें, तरी तें खाऊन आपण अमर व्हावें, अशी त्याला आपलपोटेपणाची बुद्धि झाली नाहीं. त्यानें तें जपून आणून कद्रूच्या पुत्रांना दिलें व आपल्या आईची सुटका केली. गरुडाचा पराक्रम व आईवरील प्रेम पाहून श्रीविष्णूला संतोष झाला; व तूं अमर होशील, असा त्यानें गरुडास

वर दिला. उलट गरुडानें श्रीविष्णूचें वाहन होण्याचें कबूल केलें.

---

## भाऊबंदकीचें फळ.



विभावसु व सुप्रतीक या नांवांचे दोन भाऊ होते. त्यांत विभावसु हा वडील व सुप्रतीक हा धाकटा. सुप्रतीकास भावापासून वेगळा होण्याची इच्छा झाली; तेव्हां त्यानें आपली वांटणी देण्याबद्दल त्याच्यामागें सारखें टुमणें लावलें. विभावसूनें सांगितलें कीं, बाबा, एकत्र राहिल्यापासून पुष्कळ फायदे आहेत. केवळ लोभानें भावाबंदांत भांडणें होतात; उतावळेपणानें व मूर्खपणानें भाऊभाऊ वेगळे होतात; पण असें बरें नाहीं. **आपसांत भांडणें माजलीं म्हणजे तिऱ्हाइतांचें फावतें.** अशा प्रसंगीं भांडणारांचा नाश करून ते आपलीं पोटें भरून घेतात. असा त्यानें पुष्कळ बोध केला, पण पालथ्या घागरीवर पाणी!

धाकटा भाऊ आपला हट्ट सोडीना. तेव्हां, तूं हत्ती होशील, असा विभावसूनें त्रासून त्याला शाप दिला. तूं कांसव होशील, असा सुप्रतीकानें त्याला शाप दिला. पुढें ते त्या त्या जन्माला गेले. पण तिथेही त्यांचें भांडण सुटलें नाहीं. शेवटीं ते भांडत असतां गरुडानें त्यांना खाऊन टाकलें.

---

## परीक्षितीचा मृत्यु.

:*:

परीक्षिति हा अभिमन्यूचा मुलगा. यानें हस्तिनापुर येथें साठ वर्षें न्यायानें राज्य केलें. त्याच्या राज्यांत प्रजा अत्यंत सुखी होती. त्याला शिकारीचा मोठा नाद असे. एकदां अरण्यांत पायींच तो एका हरिणाच्या मागें लागला. त्यानें त्या हरिणाला बाणानें जखमी केलें; पण तसाच तो जीव घेऊन पळत होता. व राजा त्याचा पाठलाग करीत होता. तहानेनें, भुकेनें व श्रमानें

तो शगर्दी व्याकुळ झाला होता. शेवटीं तो शमीकऋषींच्या आश्रमाजवळ आला. बाणानें घायाळ झालेला हरिण कोणीकडे पळाला ? असा त्यानें त्या ऋषींना प्रश्न केला. पण मुक्याचें व्रत घेऊन बसल्यामुळें त्यांनीं या प्रश्नाचें कांहींच उत्तर दिलें नाहीं. यामुळें रागानें त्यांच्या गळ्यांत एक मेलेला साप अडकवून राजा आपल्या नगराकडे चालता झाला. राजानें एवढा त्यांचा अपराध केला, तरी ते ऋषि रागावले नाहींत, किंवा कांहीं बोललेही नाहींत. या ऋषींचा शृंगी या नांवाचा एक मुलगा होता. तो जरा स्वभावानें तापट होता. तो या वेळीं कुठे खेळत असतां त्याच्या कुश नांवाच्या सोबत्यानें त्याला ही हकीकत कळविली. तो त्याला चिडवून म्हणाला, व्यर्थ आहे तुझी सगळी घमेंड ! त्या राजानें तुझ्या बापाचा असा अपराध करावा ना ! हें ऐकून शृंगी अगदीं संतापून गेला. नागांचा राजा तक्षक हा त्या दुष्ट राजाला दंश करून सात दिवसांत मारील, असा रागाच्या सपाट्यांत त्यानें त्या राजाला शाप दिला. नंतर आश्रमांत येऊन

त्यानें ही सगळी हकीकत आपल्या बापाला सांगितली. ती ऐकून शमीकांस फार वाईट वाटलें. ते म्हणाले, बाबारे, हें तूं बरें केलें नाहींस. क्षमा करणें हा ब्राह्मणांचा धर्म आहे. **धर्म सोडल्यानें कधींही कल्याण होत नाहीं. राजा हा सर्वांचें रक्षण करणारा आहे. त्याच्या पराक्रमामुळें सर्व प्रजेला शांतपणानें व सुखानें राहतां येतें. राजा नसेल, तर आपलीं तरी धर्मकर्में आपल्याला चालवितां येतील काय? राजाच्या हातून जरी कधीं अपराध झाला, तरी तो पोटांतच घातला पाहिजे.** असा उपदेश करून शमीकांनीं राजाला निरोप पाठविला कीं, माझ्या पुत्रानें मूर्खपणानें असा असा तुला शाप दिला आहे. तेव्हां तूं आपलें सात दिवस मोठ्या बंदोबस्तानें रक्षण कर. हा निरोप ऐकून परीक्षितीला अत्यंत दुःख झालें. त्या थोर ऋषींचा एवढा आपण अपराध केला असूनही ते आपल्यावर अगदीं रागावले नाहींत; इतकेंच नव्हे, तर मोठ्या ममतेनें त्यांनीं आपल्यावर येणाऱ्या पुढील संकटाची आपल्याला आगाऊ बातमी दिली;



त्या सर्पानें परीक्षितीच्या गळयाला दंश केला.

[ पृ. २५. ]

अशा उदार मनाच्या पुरुषाचा आपल्या हातून अपमान झाला, याबद्दल त्याला आपल्या नजीक आलेल्या मृत्यूपेक्षांही फार वाईट वाटलें. तथापि त्यानें आपलें सर्व दुःख गिळून आपल्या संरक्षणाची अगदीं जय्यत तयारी करून ठेविली. ते सात दिवस भागवत पुराण ऐकण्यांत घालविण्याचें त्यानें ठरविलें. सहा दिवस पार पडले. इकडे तक्षकाला ही सगळी बंदोबस्ताची हकीकत कळली. तेव्हां त्यानें आपल्या बरोबरच्या नागांना ब्राह्मणांचीं रूपें दिलीं; आणि दर्भ, फळें व तीर्थ त्यांजपाशीं देऊन त्यांस राजाचे भेटीस पाठविलें. राजानें त्यांचा चांगला सत्कार केला व त्यांनीं दिलेलीं फळें त्यांचा प्रसाद म्हणून त्यानें स्वीकारलीं. ते ब्राह्मण गेल्यावर राजा तीं फळें आपले मंत्री व आप्त यांबरोबर खाऊं लागला. एका आळीचें रूप घेऊन तक्षक एका बोरांत जाऊन बसला होता. आणि दैवाचा चमत्कार असा कीं, तेंच बोर राजानें उचलून फोडलें. त्यांतून ती आळी बाहेर आली व क्षणांत तिचा मोठा सर्प होऊन त्यानें परीक्षितीच्या गळ्याला दंश केला.

थोड्याच वेळांत त्या दंशानें राजा मरून पडला. त्याच्या मागून त्याचा पुत्र जनमेजय हा त्याच्या गादीवर बसला.

---

## सर्पसत्र.

जनमेजय मोठा झाला. तेव्हां आपल्या बापाला तक्षकानें कपट करून कसें मारलें, ही हकीकत त्याला वृद्ध मंत्र्यांकडून कळली. ती ऐकून त्याला फार चीड आली. व सर्व सर्पांची अग्नींत आहुति पडून त्यांचा नाश व्हावा, या हेतूनें त्यानें ‘ सर्पसत्र ’ नांवाचा एक यज्ञ करण्याचें ठरविलें. तो म्हणाला, तक्षकानें माझ्या बापाचा खून केला, हेंच खरें. शापाचें केवळ निमित्त आहे. शिवाय त्यानें दुसरी एक लबाडी केली आहे. कश्यप नांवाच्या कोणा ब्राह्मणाचे अंगीं सर्पदंश झालेल्या माणसाला बरें करण्याची विद्या होती. तो माझ्या बाबांना बरे करण्याकरितां येतही होता; पण त्या दुष्टानें त्या ब्राह्म-

णाला पुष्कळ पैसे देऊन मागें परतविलें. कोण त्याचा दुष्टपणा हा ! या त्याच्या अपराधाबद्दल त्याला शासन झालेंच पाहिजे. त्यानें आपल्या कडक विषानें माझ्या पित्याचें आंग जसें भाजलें, तसेंच मी त्याचें आंग खऱ्या आगींत भाजीन, तरच मीं आपलें कर्तव्य केलें, असें होईल. हा यज्ञाचा विचार सर्वांना पसंत पडला. सर्व तयारी होऊन यज्ञाला सुरुवात झाली. हजारों लहान-मोठे सर्प अग्नींत येऊन पडूं लागले. तेव्हां तक्षक भीतीनें इंद्राचे आश्रयास जाऊन राहिला. इकडे वासुकीलाही सत्राची बातमी ऐकून मोठी चिंता वाटूं लागली. त्यानें आपली ही चिंता आपल्या बहिणीला म्हणजे जरत्कारूला सांगितली. तेव्हां, कांहीं तरी करून या वेळीं सर्पांचे प्राण वांचीव, असें तिनें आस्तिकाला म्हटलें. आईच्या आज्ञे-प्रमाणें तो आपल्या मामाच्या कुळाचें रक्षण करण्याकरितां यज्ञमंडपांत आला. तेथें आल्यावर त्यानें जनमेजयाची, त्याच्या यज्ञाची व तेथील सर्व ब्राह्मणांची इतकी स्तुति केली कीं, ते सगळे अगदीं संतुष्ट झाले. जनमेजयानें त्याला वरही

देऊं केला. पण तक्षकाची आहुति पडेपर्यंत वर देऊं नये, असें सगळ्यांचे विचारानें ठरलें. तक्षक इंद्राच्या आश्रयाला आहे, असें कळतांच इंद्रासुद्धां तक्षकास मंत्रानें बोलवा, असें जनमेजय रागानें म्हणाला. त्याप्रमाणें ब्राह्मणांनीं मंत्र म्हणतांच दोघेही अग्निकुंडाकडे येऊं लागले. तेव्हां, आपल्याच जिवावर आलें, असें पाहून इंद्रानें तक्षकाला सोडून दिलें! तक्षक एकटाच खालीं पडूं लागला. तेव्हां आपलें आतां काम झालें, असें वाटून जनमेजयानें आस्तिकास वर मागण्याची विनंति केली. हें सर्पसत्र आतां बंद कर, असा वर त्यानें मागितला! हें त्याचें मागणें ऐकून जनमेजयास फारच दुःख झालें. वाटेल तेवढें धन मागा, पाहिजे तें मागा, पण एवढा वर मागूं नका, असें जनमेजयानें त्याला पुष्कळ सांगून पाहिलें. पण कांहीं केल्या तो ऐकेना! **धनाच्या राशींपेक्षां आपल्या आईची आज्ञा शेवटास नेणें हें अधिक चांगलें आहे,** असें त्याला वाटलें. जनमेजयाचा निरुपाय झाला. शेवटीं त्यानें ब्राह्मणास दिलेलें वचन खरें करण्या-

साठीं सर्पसत्र बंद केलें. तक्षकाचे प्राण वांचले. काळ आला होता, पण वेळ आली नव्हती, असें म्हणतात; तें हेंच. ही आस्तिकाची कामगिरी पाहून त्याच्या आईला व मामाला मोठा संतोष झाला. जे तुझें स्मरण करतील त्यांचे वाटेस सर्प जाणार नाहीत, असा वरही त्यांनीं त्याला दिला.

कोंकणांत सर्पांचें भय फार; तेव्हां तिकडे अद्यापही रात्रीं निजतांना 'आस्तिक, आस्तिक,' असें म्हणण्याची वृद्ध मनुष्यांची रीत आहे.

---

## शकुंतलेची गोष्ट.

पूर्वी विश्वामित्र या नांवाचे एक ऋषि होते. ते कडक तपश्चर्या करूं लागले. तेव्हां या तपाच्या सामर्थ्यानें हा आतां आपलें पद घेईल, अशी इंद्राचे मनांत भीति उत्पन्न झाली. त्यामुळें त्यानें त्यांच्या तपाचा भंग करण्याकरितां मेनका नांवाची

अप्सरा पाठविली. पुढें विश्वामित्रापासून तिला एक मुलगी झाली. उपजल्याबरोबर त्या मुलीला मालिनी नदीच्या कांठीं टाकून मेनका इंद्रलोकीं निघून गेली. तेव्हां त्या तान्ह्या मुलीचें रक्षण शकुंत म्हणजे पक्षी उत्तम तऱ्हेनें करीत होते. त्या नदीजवळच कण्व ऋषींचा आश्रम होता. एके दिवशीं ते मुनि नदीवर स्नानास आले असतां त्यांच्या दृष्टीस ती लहान मुलगी पडली. त्यांनीं तिला आश्रमांत नेलें; व आपल्या मुलीप्रमाणें तिचें पालनपोषण केलें. अरण्यांत शकुंतांनीं तिचें रक्षण केलें, म्हणून तिचें नांव त्यांनीं शकुंतला असें ठेविलें. लहानपणापासून त्यांनीं तिचें पालन केल्यामुळें ती त्यांना पित्याप्रमाणेंच मानीत असे. **जन्म देणारा, संकटांतून सोडविणारा व पोटाला अन्न देणारा हे तिघे बापच आहेत,** असें आपल्या शास्त्रांत सांगितलें आहे. असो.

पौरवकुळांत दुष्यंत या नांवाचा एक पराक्रमी राजा होऊन गेला. एकदां तो सैन्यासह अरण्यांत शिकार करण्याकरितां आला. शिकार करितां करितां तो मालिनी नदीच्या कांठच्या

वनांत शिरला. तें अरण्य फारच सुंदर होतें. अनेक लहानमोठीं झाडें फुलांनीं व फळांनीं तेथें शोभत होतीं. कोकिळांचा मधुर आवाज व भ्रमरांचा गुंजारव यांनीं तें अरण्य अगदीं भरून गेलें होतें; आणि मंद, शीतळ व सुगंधित असा वारा सर्वत्र वाहत होता. त्या वनाची ती अपूर्व शोभा पाहून राजा आपली तहानभूक विसरून गेला. तितक्यांत कण्व मुनींचा आश्रम त्याच्या दृष्टीस पडला. तेव्हां ऋषींचें दर्शन घेण्याच्या हेतूनें तो एकटाच आश्रमांत गेला. पण तेथें त्याला कोणी दिसेना. म्हणून त्यानें, आश्रमांत कोण आहे, असें मोठ्यानें विचारलें. कण्व मुनि आश्रमांत नव्हते. ते दूर कोठें फळें आणण्याला अरण्यांत गेले होते. तेव्हां शकुंतलेनें बाहेर येऊन राजाचा आदरसत्कार उत्तम प्रकारें केला. तिची एकंदर वागणूक पाहून राजाला मोटा संतोष वाटला. तूं कोणाची कोण व येथें आश्रमांत कां राहिली आहेस? असा नंतर त्यानें तिला प्रश्न केला. तेव्हां आपली कथा जशी कण्वांच्या तोंडून तिनें ऐकली होती, तशी त्याला अगदीं सरळ

मनानें सांगितली. ती ऐकून शकुंतला ही खरी ब्राह्मणाची मुलगी नसून राजाची म्हणजे क्षत्रियाची आहे, हें त्याला कळून आलें. व तिचे गुण व सुंदर रूप पाहून तिच्याशीं लग्न करावें, असें त्यानें मनांत ठरविलें. त्याप्रमाणें त्यानें तिला विचारलें. माझ्या पुत्राला आपल्यामागें राज्य द्याल, तर मी तुमचें म्हणणें कबूल करीन, असें ती म्हणाली. तें म्हणणें कबूल करून राजानें तिच्याशीं लागलेंच लग्न लावलें. कांहीं वेळ तेथें राहून तो आपल्या नगराला परत गेला. मागून मी मोठ्या थाटानें तुला आपल्या नगराला घेऊन जाईन, असें वचन त्यानें तिला जातांना दिलें.

दुष्यंत गेल्यावर लवकरच कण्व परत आले. इकडे झालेला सगळा प्रकार त्यांना अंतर्ज्ञानानें कळून चुकलाच होता. तेव्हां शकुंतला लाजून आपल्यापुढें नेहमींप्रमाणें आली नाहीं, असें पाहून ते म्हणाले, ‘ बाळे, लाजण्याचें कांहीं कारण नाहीं. तूं केलेंस त्यांत कांहीं गैर नाहीं. तो राजा पराक्रमी, गुणी व थोर कुळांतला असून तुला अगदीं योग्य पति आहे. ’ तुला तसाच



त्याप्रमाणें त्यानें तिला विचारलें.

[ पृ. ३२. ]

पराक्रमी पुत्र होईल, असाही त्यांनीं तिला आशीर्वाद दिला. आपलें करणें आपल्या पित्याला पसंत झालें, हें पाहून तिची काळजी दूर झाली व तिला आनंद झाला.

पुढें शकुंतलेला एक मोठा तेजस्वी पुत्र झाला. तो रूपानें चांगला होता, तसा गुणांनींही चांगला होता. तो पराक्रमी असून सुलक्षणी होता. सहा वर्षांचा झाला नाहीं, तोंच तो सिंह, वाघ, हत्ती वगैरे क्रूर पशूंना पकडून आणून झाडांला बांधून ठेवूं लागला. तो त्यांचे पाठीवर बसे व त्यांना खुशाल चोहोंकडे पाहिजे तसे फिरवी ! तो सर्व क्रूर पशूंना आपल्या ताब्यांत आणी, यावरून आश्रमांतील ऋषींनीं त्याचें सर्वदमन, म्हणजे सर्वांना आपल्या ताब्यांत आणणारा, असें नांव ठेविलें.

मुलगा मोठा झाला असें पाहून व मुलीला आतां सासरीं पाठविणें हें बरें, असें मनांत आणून कण्वांनीं शकुंतलेची आपले दोन शिष्य बरोबर देऊन दुष्यंताकडे रवानगी केली. माहेर सोडून सासरीं जातांना मुलींना फार वाईट वाटतें, तसें

तो आश्रम सोडतांना शकुंतलेला फार वाईट वाटलें. ते शिष्य मुलासह तिला घेऊन हस्तिनापुराला आले. राजा त्या वेळीं दरबारांत बसला होता. त्यांनीं त्यांना त्याच्यापुढें नेऊन उभें केलें. या आपल्या स्त्रीपुत्रांना संभाळ व आपल्या थोर कुळाला योग्य असें आचरण यांच्याशीं ठेव, असा कण्व मुनींचा निरोप सांगून ते आश्रमास परत आले.

आश्रमांत दिलेल्या वचनाची शकुंतलेनें दुष्यंतास आठवण दिली; व या आपल्या पुत्रास आतां युवराज करा, असेंही तिनें त्यास सुचविलें. राजानें तिला मनांत ओळखलें; पण तसें कांहीं बाहेर न दाखवितां तो म्हणाला, 'हे दुष्ट तापसी, तूं कोणाची कोण आहेस ? तूं म्हणतेस त्यांतलें मला कांहींदेखील माहीत नाहीं. तुझा व माझा कोणत्या तरी प्रकारचा संबंध आहे, असें मला आठवत नाहीं. तूं आलीस तशी येथून निघून जा; मी तुझ्या भाषणानें फसावयाचा नाहीं.' हें निर्दयपणाचें भाषण ऐकून बिचारी शकुंतला दुःखानें अगदीं भांबावून गेली ! दुःख व संताप

यांनीं तिला कांहीं सुचेना. तथापि क्षणभर राग आंवरून ती म्हणाली, ' महाराज, खरें काय व खोटें काय, हें तुमचें मन जाणतच आहे. सामान्य माणसाप्रमाणें आपण असत्य भाषण कां करितां ? **मनांत एक असून जो जनांत भलतेंच दाखविता, तो चोरच होय. त्यानें मग कोणतें पातक करावयाचें राहिलें ? मला कोणी पहात नाहीं, असें समजून मनुष्य पाप करण्यास तयार होतो, पण परमेश्वर मनुष्याचीं सगळीं कृत्यें पाहत असतो.**

मी आपण होऊन आपल्याकडे आल्यें, म्हणून माझा अनादर करूं नका. ' आपलें म्हणणें राजा ऐकत नाहीं, असें पाहून तिचा राग फिरून अनावर झाला. तरी पुन्हा शांत होऊन ती म्हणाली, ' महाराज, असा अविचार करून माझा व पुत्राचा त्याग करूं नका. **पुरुषाला स्त्रीसारखा दुसरा मित्र नाहीं. त्याला संसारांत तिच्यामुळेंच सुख होतें. संसारांत व धर्मकार्यांत ती त्याला साहाय्य करिते. पतीवर संकट आलें असतां स्त्रीमात्र त्याचा**

**त्याग करून जात नाहीं.** महाराज, याउपर माझा त्याग आपल्याला करावयाचा असेल, तर खुशाल करा; पण या बाळाचा तरी त्याग करूं नका. '

शकुंतलेचें हें दीनवाणें भाषण ऐकूनही राजाला तिची दया येईना. तो म्हणाला, ' बायका फार लबाड असतात. तुझ्या बोलण्यावर माझा विश्वास बसत नाहीं. तूं मुकाट्यानें येथून चालती हो. तुझ्या मेनकेची योग्यता मला ठाऊक आहे. ' यावर शकुंतलेनें त्वेषानें उत्तर दिलें, ' राजा, दुसऱ्याच्या डोळ्यांतलें कुसळ तुला दिसतें, पण स्वतांच्या डोळ्यांतलें मुसळही दिसत नाहीं ! माझ्या कुळाची तूं निंदा कर; पण तुझ्यापेक्षां माझें कुळ श्रेष्ठ आहे. माझी माता मेनका ही स्वर्गातील अप्सरा आहे. तूं नुसता मृत्युलोकचा एक भिकार राजा आहेस. तूं माझी बरोबरी कशी करणार ? **जो दुर्जन असतो, तोच सज्जनास दुर्जन म्हणत असतो.** जो पुत्राचा त्याग करितो, त्याच्या वैभवाचा नाश देव करितात. शंभर यज्ञांपेक्षां पुत्राची योग्यता अधिक आहे;

पण पुत्राहूनही सत्याची थोरवी ज्यास्त आहे. वेदांचा अभ्यास केला, तीर्थांचीं स्नानें केलीं; आणि सत्यमात्र मोडून दिलें; तर त्याचा आहे का कांहीं उपयोग ? कांहीं नाहीं. सत्यासारखा दुसरा धर्म नाहीं. सत्याहून कांहींच श्रेष्ठ नाहीं. इतकें मी सांगत असूनही जर माझें बोलणें तुला खरें वाटत नसेल, व सत्य जर तुला समजून-उमजून टाकावयाचें असेल, तर तुझ्याजवळ राहण्याची माझीही इच्छा नाहीं. तूं जरी माझ्या मुलाला युवराज केला नाहींस, तरी तो आपल्या पराक्रमानें सर्व पृथ्वीचें राज्य प्राप्त करून घेईल. '

इतकें बोलून शकुंतला निघून जाऊं लागली; पण इतक्यांत अशी आकाशवाणी झाली कीं, ' राजा, शकुंतला सांगत आहे, तें सर्व खरें आहे. ती तुझी स्त्री असून हा पुत्रही तुझाच आहे. याचें तूं भरण ( पालनपोषण ) कर; व याचें नांव भरत असें ठेव. ' ही आकाशवाणी झाल्यावर राजा सभेंतील प्रधान, गुरु वगैरे मंडळीला म्हणाला, ' ही आकाशवाणी आपण

एकलीच. हा माझाच पुत्र आहे, हें मी जाणत होतोंच; पण लोकांच्या मनांत भलतीच शंका येऊं नये म्हणून मीं याचा व हिचा स्वीकार केला नाहीं.' नंतर त्यानें त्या दोघांचा मोठ्या प्रेमानें स्वीकार केला. पुत्राचें नांव **भरत** असें ठेवून त्यानें त्याला युवराज केला. हा **भरत** मोठा पराक्रमी राजा झाला. त्यानें सर्व हिंदुस्थानावर राज्य केलें. याच्या नांवावरून त्याच्या सर्व कुळाला **भरतकुल** असें नांव मिळालें. व त्याच्या वंशांत उत्पन्न झालेल्या पुरुषांना **भारत** असें नांव पडलें. या **भारतांच्या** कथा ज्या ग्रंथांत आहेत, तो ग्रंथ महाभारत या नांवानें प्रसिद्ध आहे.

---

## नहुष राजा.



**सोमवंशांत पुरूरवा** या नांवाचा एक मोठा राजा होऊन गेला. त्याचा नातू **नहुष**; हा मोठा शूर व पराक्रमी होता. त्यानें उत्तम प्रकारें राज्य

करून प्रजेला सुखांत ठेविलें. धर्माकडेही त्याचें फार लक्ष असे. तो ऋषींना आपल्या पाठी-वरून पशूप्रमाणें वाहून नेत असे! एकदां कांहीं कारणानें इंद्राचें डोकें फिरून तो कोठें नाहींसा झाला. तेव्हां आतां आपला राजा कोणाला करावें, या विचारांत देव पडले. शेवटीं देव व ऋषि यांनीं, नहुष राजाला इंद्रपदावर बसवावें, असें ठरविलें. त्याप्रमाणें नहुष स्वर्गाचा राजा झाला. पण **मोठें वैभव प्राप्त झालें, म्हणजे मनुष्याची बुद्धि बहुधा फिरते.** तसेंच नहुषाचें झालें. तो ऐश्वर्यानें धुंद होऊन गेला. एकदां इंद्राची बायको इंद्राणी ही त्याच्या दृष्टीस पडली. तेव्हां पापबुद्धि त्याच्या मनांत उत्पन्न झाली. ती आपल्याला मिळावी, असें त्याला वाटलें. तेव्हां इंद्राणी घाबरून बृहस्पतींना शरण गेली. मग बृहस्पतींनीं तिला असें सुचविलें कीं, आपण एका अपूर्व वाहनांत बसून मजकडे या, म्हणजे मी आपली इच्छा पूर्ण करीन, असें तूं नहुषाला सांग. तसा तिनें नहुषाला निरोप पाठ-विला. तेव्हां असें अपूर्व वाहन कोणतें तयार

करावें, या विचारांत तो पडला. शेवटीं त्यानें असें ठरविलें कीं, आपण रथांत बसून तो रथ ऋषींकडून ओढवावा; म्हणजे आजपर्यंत असें कोणींच केलें नसल्यानें तें वाहन अपूर्व होईल. त्याप्रमाणें त्या मूर्खानें वैभवाच्या धुंदींत ऋषींना आपला रथ ओढायला लावलें! अशा थाटांत स्वारी इंद्राणीकडे जाण्यास निघाली. जातां जातां ऋषींना पाय लावून 'सर्प, सर्प' म्हणजे चला चला, असें तो डौलांत म्हणाला. त्या ऋषींत अगस्ति होते. त्यांनीं रागावून त्याला शाप दिला कीं, तूं ब्राह्मणांच्या मस्तकांना पाय लावून 'सर्प, सर्प' म्हणालास, तेव्हां तूं सर्प होऊन दहा हजार वर्षें पृथ्वीवर राहशील. त्याप्रमाणें तो पृथ्वीवर सर्प होऊन राहिला. पुढें धर्मराजाच्या दर्शनानें तो मुक्त झाला व पुन्हा स्वर्गाला गेला.



# ययाति राजा.



ययाति हा नहुष राजाचा पुत्र. हा मोठा धार्मिक राजा होता. देव व ब्राह्मण यांवर त्याची मोठी भक्ति असे. तो पराक्रमीही तसाच होता. त्यानें अगदीं न्यायानें राज्य करून व प्रजेचें उत्तम प्रकारें पालन करून आपल्या सर्व प्रजेला सुखांत ठेविलें. त्याला दोन बायका होत्या— देवयानी व शर्मिष्ठा. देवयानीला दोन पुत्र झाले,— यदु व तुर्वसु. द्रुह्यू, अनु आणि पुरु असे तीन पुत्र शर्मिष्ठेचे होते. एकदां कांहीं कारणानें शुक्राचार्यांचा म्हणजे देवयानीच्या पित्याचा ययाति राजावर राग झाला. व त्यांनीं त्या रागाच्या भरांत त्याला असा शाप दिला कीं, तूं तरुण असूनही तुला जरा ( म्हातारपण ) प्राप्त होईल. हा शाप ऐकून त्याला फार वाईट वाटलें, व आपलेवर दया करण्याबद्दल शुक्राचार्यांचीं त्यानें फार आर्जवें केलीं. तेव्हां शुक्राचार्यांनीं त्याला उलट असें सांगितलें कीं, ही जरा दुस-

त्यास देऊन तुला त्याचें तारुण्य घेतां येईल. तुझ्या पांच पुत्रांपैकीं जो कोणी तुझी जरा घेईल, त्याला राज्य, पुण्य, कीर्ति, आयुष्य व संतति यांचा लाभ होईल.

पुढें, आपलें तारुण्य देऊन माझें वृद्धपण घेण्याला तुम्हांपैकीं कोण तयार आहे, असें त्यानें आपल्या पांच पुत्रांना विचारलें. पण अशी अदलाबदल करण्यास पहिल्या चार पुत्रांपैकीं एकही तयार झाला नाहीं. सर्वांत धाकटा पुत्र पुरु हामात्र पित्याच्या म्हणण्याला कबूल झाला. **आईबापांच्या इच्छेप्रमाणें वागून व वेळ पडल्यास स्वतां दुःख भोगून त्यांना सुख देईल, तोच खरा पुत्र होय.** असो. पहिल्या चार पुत्रांनीं आपलें म्हणणें मान्य केलें नाहीं, म्हणून ययातीनें त्यांतील प्रत्येकाला शाप दिला. पुरूची आपल्यावरील भक्ति पाहून तो त्याच्यावर अगदीं संतुष्ट झाला; व तुझ्या प्रजेच्या सर्व इच्छा तृप्त होऊन तिची चांगली भरभराट होईल असा त्यानें त्याला वर दिला.

संसारांतील सर्व सुखें भोगतां यावीं, म्हणून ययातीनें आपलें वृद्धपण देऊन आपल्या पुत्रापासून तरुणपण घेतलें. नंतर तो नुसतीं सुखें भोगीत राहिला. त्याला असें वाटत होतें कीं, आपण खूप सुखें भोगलीं कीं, आपलें मन अगदीं तृप्त होईल. मग सुखाची इच्छा म्हणून उत्पन्न होणार नाहीं. पण तसें कुठलें व्हायला ? विस्तवावर तूप ओतीत गेलें, तर तो विस्तव विझण्याची आशा आहे का ? नाहीं. तो अधिकच भडकत जाणार ! तसेंच संसारांतील सुखांचें आहे. **मन जशीं सुखें मागत जाईल, तशीं जर आपण पुरवीत गेलों, तर मनाची तृप्ति कधींच होणार नाहीं. त्याची भूक वाढतच** जाईल. ययातीला शेवटीं हाच अनुभव आला. त्यानें यथेच्छ सुखें भोगलीं, तरी मनाला सुखाचा कंटाळा म्हणून येईना ! तेव्हां त्याचे डोळे उघडले ! मग त्यानें पुरूला त्याचें तारुण्य देऊन आपलें वृद्धपण परत घेतलें. नंतर त्यानें त्याला राज्यावर बसविलें व आपण तपश्चर्या करण्याकरितां वनांत निघून गेला. तेथें त्यानें उत्तम

प्रकारें तप केल्यामुळें त्याला अखेर स्वर्गाची प्राप्ति झाली. पण, मजसारखा तपस्वी त्रैलोक्यांत एकही नाहीं, अशी त्यानें स्वर्गांत एका प्रसंगीं बढाई मारल्यामुळें त्याच्या पुण्याचा क्षय ( नाश ) झाला, व तो पृथ्वीवर पडूं लागला. तेव्हां अष्टक, प्रतर्दन, वसुमान व शिबी या चार पुण्यवान् राजांनीं आपलीं सगळीं पुण्यें त्याला देऊं केलीं. पण क्षत्रियानें कोणत्याही वस्तूचें दान घेणें योग्य नसल्यामुळें ययातीनें त्यांचीं पुण्यें घेतलीं नाहींत. पण वरील चारी राजांचें औदार्य व ययातीची धर्मनिष्ठा पाहून देवांनीं त्या पांचही राजांना स्वर्गास नेलें.

---

# कच व देवयानी.



पूर्वी देव व दानव किंवा दैत्य यांचीं नेहमीं युद्धें होत असत. असेंच एकदां दोघांमध्यें कांहीं कारणावरून युद्ध सुरू झालें. युद्ध सुरू झालें

म्हणजे दोन्ही पक्षांकडले लोक मरणारच. त्याप्रमाणें याही युद्धांत होऊं लागलें. पण दैत्यांचे गुरु शुक्राचार्य यांना संजीवनी नांवाचा एक मंत्र येत होता. दैत्यांचे बाजूचे जे जे वीर मरत, त्यांना ते त्या संजीवनीविद्येच्या सामर्थ्यानें पुन्हा जिवंत करीत. यामुळें दैत्यांचा चांगलाच फायदा होऊं लागला. त्यांचें सैन्य आपलें कायमचें कायम राहूं लागलें. पण देवांचें तसें कांहीं होईना. कारण त्यांचे गुरु बृहस्पति यांना संजीवनी विद्या कांहीं येत नव्हती. आपलें सैन्य कमी कमी होतें आहे, असें पाहून देवांना मोठी काळजी उत्पन्न झाली. काय करावें, हें कांहीं त्यांना सुचेना. दिवसेंदिवस आपला पक्ष दुर्बळ व शत्रूचा पक्ष प्रबळ होत आहे, असें पाहून कोणाला बरें चैन पडेल? संजीवनीविद्या हरप्रयत्नानें मिळविल्याशिवाय आपल्याला जय मिळणार नाहीं, असें देवांचें शेवटीं ठाम मत झालें. बरोबरच आहे; **आपला शत्रु आपल्यापेक्षां विशेष प्रबळ कशानें झाला आहे, हें विचारानें जाणून तें सामर्थ्य आपल्या अंगीं आणल्यावांचून**

**कोणालाही जय कसा मिळणार ?** असो. ही विद्या मिळवून आणण्याचे कामीं देवांनीं आपल्या गुरूचा मुलगा **कच** याची योजना केली. व **कचाचे** अंगीं सर्व उत्तम गुण भरलेले असल्यामुळें तोच या कठिण कामाला योग्य होता.

शुक्राचार्यांना देवयानी या नांवाची एकुलती एक मुलगी होती. ती त्यांची फार लाडकी असे. तिनें कोणतीही गोष्ट मागितली, तरी शुक्राचार्य तिला कधीं नाहीं म्हणत नसत. ही गोष्ट देवांना ठाऊक असल्यामुळें त्यांनीं **कचासारख्या** हुशार व सद्-गुणी माणसाकडे हें बिकट काम सोंपविण्याचें ठरविलें. **कचाचे** गुण पाहून देवयानीचा लोभ त्याच्यावर बसेल, व शेवटीं तिच्यामुळेंच **कचाला** विद्या प्राप्त होईल, अशी त्यांची खातरी होती. **आपल्या पक्षाचें हित करण्याकरितां शत्रूचे गोटांत जाऊन विद्या मिळवून आणण्याचें बिकट काम कोणीं तरी केलें हें पाहिजेच,** असा विचार करून **कचानेंही** ती कामगिरी मोठ्या आनंदानें आपल्या आंगावर घेतली. व तो दानवांचा राजा वृषपर्वा याच्या राजधानींत आला;

आणि शुक्राचार्यांकडे जाऊन, मी बृहस्पतींचा पुत्र आहें, माझें नांव कच, शिष्य या नात्यानें आपली सेवा करावी, याच हेतूनें मी आलों आहें, असें त्यानें त्यांस कळविलें. तो जरी शत्रूचा मुलगा होता, तरी शुक्राचार्यांनीं त्याला आपल्याकडे राहण्याची परवानगी दिली. पूर्वीं आपल्याकडे अशी चाल होती कीं, ज्याला कोण-तीही विद्या शिकावयाची असेल, त्यानें ज्याला ती विद्या उत्तम येत असेल, त्याच्याकडे जावें व त्याची सेवा करण्याची परवानगी मागून ती मिळाल्यावर सेवा करीत राहावें. कोणींही आपली उत्तम सेवा केली, म्हणजे त्याच्यावर आपण साहजिक संतुष्ट होतों. तसेंच जो शिष्य उत्तम सेवा करी, त्याच्यावर गुरूचें मन अर्थात्‌च संतुष्ट होई. मग मन मोकळें करून आपल्याला येत असलेली सगळी विद्या तो शिष्याला सांगे. **पैशानेंसुद्धां जें काम होणार नाहीं तें प्रेमानें होतें.** असो.

शुक्राचार्यांनीं कचाला आपलेजवळ ठेवून घेतल्यानंतर तो अगदीं झटून त्यांची व देव-

यानीची सेवा करूं लागला. दोघांचींही मनें त्याच्यावर बसलीं. देवयानी तर त्याला अगदीं जीव कीं प्राण करूं लागली. इतकें सगळें झालें खरें, पण दैत्यांना हें कांहीं रुचलें नाहीं. शत्रू-कडचा कच आपल्या बाजूची विद्या नेण्या-करितांच आला असावा, असा त्यांना संशय आला. व त्यांनीं त्याचा नाश करण्याचें मनांत आणलें. त्याप्रमाणें कच हा एके दिवशीं रानांत गुरूच्या गाई राखीत असतां राक्षसांनीं देवांच्या द्वेषामुळें व संजीवनीविद्या जाऊं नये म्हणून त्यास ठार मारलें, व त्याच्या शरीराचे तुकडे तुकडे करून ते कोल्ह्यांलांडग्यांकडून खाव-विले ! इकडे, सायंकाळ झाला, सूर्य मावळला, गाई एकट्याच परत आल्या, असें पाहून देव-यानीचें मन बावरून गेलें. कचाचा कांहीं तरी घातपात झाला असावा, असा तिला संशय आला. व ती बापास म्हणाली, कच मला आज जर दिसला नाहीं, तर मी आपला प्राण घटकाभर-सुद्धां ठेवणार नाहीं. आपल्या लाडक्या मुलीचा हा निर्धार पाहून शुक्राचार्यांनीं संजीवनीमंत्र

जपला व 'कचा, ये !' अशी हांक मारली. तों कचाचें मांस पशूंचीं पोटें फाटून बाहेर निघालें व त्या मांसाचें पूर्वींसारखें शरीर बनून कच सजीव होऊन उठला ! मग देवयानीनें विचारल्यावरून वनांत घडलेली सगळी हकीकत कचानें तिला सांगितली. यानंतर कांहीं दिवसांनीं पुन्हा कच देवयानीचे सांगण्यावरून एके दिवशीं फुलें आणण्याकरितां वनांत गेला. तेव्हां राक्षसांनीं पुन्हा त्याला ठार केलें ! व त्याचे तुकडे करून ते समुद्रांत फेंकून दिले ! देवयानीनें हट्ट धरून पुन्हा त्याला आपल्या बापाकडून जिवंत करविलें ! राक्षसही हट्टास पेटले ! त्यांनीं संधी साधून पुन्हा त्याला मारिलें ! या वेळीं त्यांनीं त्याला जाळलें; व त्याच्या हाडांचें चूर्ण करून तें चूर्ण व त्याच्या शरीराची राख हीं दारूंत मिसळून ती दारू शुक्राचार्यांस पाजली ! कच नाहीं, असें पाहून देवयानी घाबरली. कचाला जिवंत करण्याबद्दल पुन्हा तिनें बापाजवळ हट्ट घेतला ! कांहीं केल्या ती ऐकेना. तेव्हां निरुपाय होऊन शुक्राचार्यांनीं मंत्र जपला व कचाला हांक मारिली.

तेव्हां कचानें त्यांच्या पोटांतूनच ' ओ ' दिली! तेव्हां शुक्राचार्य म्हणाले, तुला कच पाहिजे असेल, तर मी मरेन; कारण माझें पोट फाडल्याशिवाय त्याला बाहेर येतां येणार नाहीं; व मी हवा असेन तर कच बाहेर दिसणार नाहीं. तेव्हां देवयानीनें उत्तर केलें, मला दोघेही हवेत. तुम्हां दोघांपैकीं कोणाचाही नाश झाला, तर मी जीव ठेवणार नाहीं. शेवटीं निरुपाय झाल्यामुळें शुक्राचार्यांनीं कच पोटांत असतांच त्याला संजीवनीविद्या शिकविली! नंतर तो गुरूचें पोट फाडून बाहेर आला. व स्वतां मंत्र जपून त्यानें गुरूस जिवंत केलें! **आपल्या दारू पिण्याच्या संवयीमुळें एवढा घात झाला** हें पाहून शुक्राचार्यांना दारूचा अगदीं तिटकारा आला. व **आजपासून जो ब्राह्मण दारू पिईल, त्याला ब्राह्मण मारल्याचें पातक लागेल,** असा त्यांनीं कडक नियम घातला!

**जगांत कधीं कधीं असें होतें कीं, आपण आपल्या फायद्याकरितां म्हणून दुष्ट कृत्यें करितों, पण तींच दुष्ट कृत्यें आपल्या**



तूं गुरूची मुलगी असल्यामुळें माझी बहीण होतेस

[ पृ. ५

तोट्याला कारण होतात. तसें राक्षसांचें झालें. संजीवनीविद्या आपले हातून शत्रूकडे जाऊं नये, म्हणून तीनदां त्यांनीं कचाला ठार मारलें! पण शेवटीं त्यामुळेंच त्याला ती विद्या प्राप्त होऊन राक्षसांचें नुकसान झालें. असो.

अशा रीतीनें आपलें काम झालें, असें पाहून कच गुरूची आज्ञा घेऊन आपल्या घरीं जाण्यास निघाला. तेव्हां, तूं माझ्याशीं लग्न लाव, असें देवयानीनें त्याला म्हटलें. तेव्हां कचानें उत्तर केलें, गुरु व पिता यांची योग्यता सारखी आहे; तेव्हां तूं गुरूची मुलगी असल्यामुळें माझी बहीण होतेस; व बहिणीनें भावाशीं लग्न लावणें हा अधर्म आहे. अधर्मानें वागल्यानें माणसाला केव्हांही सुख होत नाहीं. तेव्हां हा विचार तूं सोडून दे. पण हें त्याचें उत्तर देवयानीला रुचलें नाहीं. मनुष्य एकदां कोणत्याही विचारानें वेडें झालें, म्हणजे मग त्याची बुद्धि मळीण होते. त्याला चांगलें-वाईट, धर्म-अधर्म कांहीं समजेनासें होतें. त्याच्या डोक्यानें जें घेतलें असेल, तेंच त्याला उत्तम वाटूं लागतें. तसेंच

या वेळीं देवयानीचें झालें. आपली इच्छा हा पूर्ण करीत नाहीं, असें पाहून ती फार रागावली. व जी विद्या तूं येथून नेत आहेस ती तुला सफल होणार नाहीं, असा तिनें त्याला त्या आवेशांत शाप दिला.

नंतर कच म्हणाला, **अधर्म करावयाचा नाहीं**, याचसाठीं मी तुझें म्हणणें मान्य करीत नाही. **धर्मप्रमाणें जो चालतो त्याला कोणी तसें करण्याबद्दल जर शाप दिला, तर तो शाप त्याच्याच कीर्तीला कारण होतो.** आतां ओघालाच आलें, तेव्हां मीही तुला उलट शाप देतों घे. तुला कोणीही ब्राह्मणपुत्र वरणार नाहीं. तुझ्या शापानें मला माझी विद्या सफळ होणार नाहीं. पण मी ही ज्याला शिकवीन, त्याला ती सफळ होईल. असें बोलून कच स्वर्गास गेला. तेथें गेल्यावर विद्या त्यानें आणली, हें पाहून देवांना मोठा आनंद झाला व त्यांनीं विमानांतून त्याची मिरवणूक काढून त्याचा मोठा सन्मान केला. **सर्व लोकांच्या हिताचें जो काम करितो तो सर्वांना आवडता होतोच.**

# देवयानी व शर्मिष्ठा.



शुक्राचार्यांकडून कच जी विद्या घेऊन आला, ती सर्व देव त्याजपासून शिकले. हा विद्येचा जोर मिळाल्यामुळें देवांना मोठा हुरूप आला. व राक्षसांवर हल्ला करण्याचा ते विचार करूं लागले. याच विचारांत देव असतांना इंद्राला अशी कल्पना सुचली कीं, कांहीं तरी करून दैत्यांचा राजा वृषपर्वा व शुक्राचार्य यांचें वितुष्ट पाडावें. म्हणजे दैत्यांचा पक्ष चांगलाच दुर्बळ होईल. या हेतूप्रमाणें त्याला एक दिवस तसें भांडण लावण्याची संधी मिळाली. एकदां इंद्र देवांसह आकाशांतून चालला होता. त्या वेळीं देवयानी व वृषपर्व्याची मुलगी शर्मिष्ठा या आपल्या कांहीं मैत्रिणींसह अरण्यांतील एका सरोवरांत क्रीडा करीत होत्या. तेव्हां इंद्रानें त्या दोघींत भांडण लावण्याकरितां वायूचें रूप घेऊन त्यांचीं तीरावरील वस्त्रें एकमेकांत मिसळून टाकिलीं. तीरावर आल्यावर जीं वस्त्रें हातीं लागलीं तीं घेऊन त्या मुली गड-

बडीनें नेसल्या. अशा धांदलींत शर्मिष्ठा चुकून देवयानीचें वस्त्र नेसली. यामुळें दोघींत भांडण सुरू झालें. दोघींनीं एकमेकींच्या पुष्कळ उखाळ्यापाखाळ्या काढल्या ! होतां होतां अखेर देवयानीला एका विहिरींत ढकलून व ती मेली असें समजून शर्मिष्ठा रागारागानें राजवाड्यांत परत आली. कांहीं वेळानें नहुषाचा पुत्र ययाति राजा शिकार करीत करीत त्या अरण्यांत आला. व त्याला तहान लागली होती, म्हणून तो त्या विहिरीजवळ गेला. तों ती विहीर कोरडी असून आंत एक सुंदर कन्या पडली आहे, असें त्याच्या दृष्टीस पडलें. त्यानें विचारल्यावरून देवयानीनें, आपण कोण, हें त्याला सांगून माझा उजवा हात धरून मला या विहिरींतून वर काढा, असें त्याला विनविलें. ती ब्राह्मणाची मुलगी असून संकटांत पडली आहे, असें जाणून त्यानें आपल्या उजव्या हातानें तिचा उजवा हात धरून तिला वर काढलें. व तिचा निरोप घेऊन तो आपल्या राजधानीस परत गेला. ययाति गेल्यानंतर देवयानीनें आपल्या घूर्णिका नांवाच्या मैत्रिणीस, वृषपर्व्याच्या नग-

राचें मी यापुढें दर्शनसुद्धां घेणार नाहीं, असा निरोप आपल्या बापाला जाऊन सांगण्यास सांगितलें. त्याप्रमाणें शुक्राचार्यांकडे जाऊन घूर्णिकेनें तो देवयानीचा निरोप व शर्मिष्ठेचें दुष्ट वर्तन हीं त्यांना सांगितलीं. तेव्हां ते आपल्या लाडक्या मुलीकडे दुःखानें धांवतच आले. तेव्हां देवयानीनें त्यांना झालेली सर्व हकीकत सांगितली. त्यावर शुक्राचार्यांनीं तिची पुष्कळ समजूत घातली. पण तिचा राग शांत होईना. शर्मिष्ठा तिला जीं दुरुत्तरें बोलली होती, तीं तिचें अंतःकरण सारखें जाळीत होतीं. त्यामुळें ती वृषपर्व्याचे नगरांत जाण्यास कबूल होईना. तेव्हां शुक्राचार्य वृषपर्व्याकडे गेले व झालेल्या हकीकतीबद्दल त्याची चांगली कानउघाडणी करून यापुढें तुझ्या राज्यांत राहण्याची माझी आतां इच्छा नाहीं, असें त्यांनीं त्याला सांगितलें. मग वृषपर्वा त्यांना शरण गेला व म्हणाला, दानवांची व माझी सर्व धनदौलत आणि मी स्वतां यांचे मालक आपण आहां. तेव्हां शुक्राचार्यांचें समाधान झालें व त्यांनीं वृषपर्व्यास सांगितलें कीं, तूं आधीं

जाऊन माझ्या देवयानीची समजूत घाल. नंतर ते दोघे देवयानीकडे आले. वृषपर्व्यानें देवयानीची प्रार्थना केली व म्हटलें, काय मागशील तें मी तुला देतों, पण तूं आमच्यावर रागावूं नकोस. यावर देवयानी म्हणाली, तुझी मुलगी पदोपदीं माझा अपमान करिते, आपण राजकन्या आहों, असा तिला तांठा आहे; तेव्हां आपल्या एक हजार दासींसह तिनें माझी दासी झालें पाहिजे, व मी सासरीं गेल्यावर त्यांनीं मजबरोबर आलें पाहिजे. हें बोलणें ऐकून वृषपर्व्यानें आपल्या कन्येला तेथें आणविलें. आपल्या चुकीमुळें शुक्राचार्यांनीं येथून निघून जावें व तेणेंकरून सर्व दैत्यांच्या पक्षाचा घात व्हावा, हें तिला बरें वाटलें नाहीं. यासाठीं आपण राजकन्या असूनही **आपल्या लोकांच्या हितासाठीं देवयानीची दासी होण्याचें तिनें कबूल केलें. आपल्या लोकांवर संकट येत असतां स्वतांच्या मानापमानाकडे न पाहतां तें टाळण्याचा प्रयत्न करणें हें प्रत्येकाचें कर्तव्य आहे.** तें कर्तव्य या वेळीं शर्मिष्ठेनें केलें. शर्मिष्ठा आपल्यापुढें

वांकली हें पाहून देवयानीला आनंद झाला, व ती नगरांत मोठ्या थाटानें परत आली.

पुढें कांहीं काळानें देवयानीला विहिरींतून वर काढणाऱ्या ययाति राजाबरोबर तिचें लग्न झालें. शर्मिष्ठा आपल्या वचनाप्रमाणें आपल्या एक हजार दासींसह तिच्याबरोबर तिची दासी म्हणून गेली. ययातीनें देवयानीला आपल्या वाड्यांत ठेविलें व शर्मिष्ठेला एक निराळा वाडा बांधून दिला. तेथें ती आपल्या दासींसह राहात असे. कांहीं दिवसांनीं ययातीनें गुप्तपणें शर्मिष्ठे-शींही लग्न लावलें. दोघींनाही त्याच्यापासून मुलगे झाले. शर्मिष्ठेला तीन झाले व देवयानीला दोन झाले. शर्मिष्ठेशीं राजानें लग्न केलें आहे व त्याच्यापासून तिला मुलगे झाले आहेत, ही गोष्ट पुष्कळ दिवस देवयानीला कळली नव्हती; पण ती एके दिवशीं सहज तिला माहीत झाली. मग तिचा राग काय विचारतां ! ती शर्मिष्ठेला पुष्कळ टाकून बोलली व मला आतां येथें राहा-वयाचें नाहीं, असें ययातीला सांगून नागिणी-प्रमाणें रागानें फोंफावत आपल्या बापाकडे जाण्यास

निघाली. तिची समजूत करीत राजाही तिच्यामागून जाऊं लागला. पण तिनें त्याच्याकडे लक्षही दिलें नाहीं. लवकरच दोघेंही शुक्राचार्यांकडे आलीं. देवयानीनें राजाचें कपटी वर्तन शुक्राचार्यांना सांगितलें. तेव्हां शुक्राचार्यांनीं राजास शाप दिला कीं, तूं तरुण असूनही तुला जरा ( म्हातारपण ) प्राप्त होईल. हा भयंकर शाप ऐकून राजास फार वाईट वाटलें व तो शुक्राचार्यांपुढें गयावयां करूं लागला, तेव्हां शुक्राचार्यांनीं उःशाप ( पहिल्या शापाचा जोर कमी करणारा वर ) देऊन सांगितलें कीं, तुला ही आपली जरा दुसऱ्यास देतां येईल; तुझ्या पांच पुत्रांपैकीं जो ही तुझी जरा घेईल, त्याला राज्य, पुण्य, कीर्ति, आयुष्य व संतति यांचा लाभ होईल. नंतर राजा देवयानीसह आपल्या नगरास परत आला.

---



# मांडव्य ऋषि.



मांडव्य या नांवाचे एक ऋषि होते. ते मोठे विद्वान्, धर्माप्रमाणें चालणारे व निरंतर तप आचरणारे असे होते. एके दिवशीं आपल्या आश्रमाजवळच्या एका वृक्षाखालीं वर हात करून व मौन ( मुकेपणा ) धरून ते तपश्चर्या करीत असतां, कांहीं चोर लूट घेऊन तेथें आले. राजाचे शिपाई त्यांच्या पाठीस लागले होते. त्यामुळें त्यांनीं तें चोरून आणलेलें द्रव्य आश्रमांत टाकलें, व आपण तेथेंच लपून बसले. मागून शिपाई आले. चोर कोणत्या मार्गानें गेले तें आम्हांस लवकर सांगा, असें मांडव्य ऋषींस त्यांनीं अगदीं नम्रपणें म्हटलें. मुक्याचें व्रत घेतल्यामुळें ऋषींनीं कांहींच उत्तर दिलें नाहीं. आपण यांना उत्तर दिलें नाहीं, तर आपल्यावर संकट आल्यावांचून राहणार नाहीं, हें त्यांना पक्कें ठाऊक होतें. पण **आपण एकदां जें व्रत घेतलें तें संकटाचे भीतीनें सोडून देणें हें योग्य नव्हे, असें**

जाणून ते कांहींच बोलले नाहींत. पुढें त्या शिपायांनीं सर्व आश्रम धुंडाळला। तेव्हां तेथें लपलेले चोर व त्यांनीं आणलेलें द्रव्य हीं त्यांना सांपडलीं. मांडव्य ऋषींनीं, आ.ण पहिल्यानें त्यांना विचारलें, तेव्हां मौन धरलें, यामुळें शिपायांस त्यांचाही संशय आला. यामुळें चोरांबरोबर त्यांनाही बांधून शिपायांनीं राजाकडे नेलें. राजानें त्या सगळ्यांना सुळावर चढविण्याची शिक्षा दिली. राजाच्या त्या हुकमाप्रमाणें सर्वांना सुळावर चढविलें. चोर लवकरच मरण पावले; पण मांडव्यऋषि आपल्या तपाच्या सामर्थ्यानें, कांहीं न खातां, न पितां, अनेक दिवस तसे सुळावर वांचले. अशी त्यांची स्थिति ऐकून दुसरे अनेक तपस्वी रात्रीं पक्ष्यांच्या रूपानें येऊन त्यांना खायला देत व त्यांचें समाधान करीत. मांडव्यांना सुळीं दिलें, तरी ते मरत नाहींत, असें पाहून शिपायांनीं ती वर्दी राजाला दिली. तो चमत्कार ऐकून आपण एका मोठ्या तपस्वी ब्राह्मणाला विनाकारण सुळावर चढविलें, असें त्याच्या लक्षांत आलें. नंतर तो मांडव्यांकडे आला; व मजकडून हा चुकून अपराध घडला,

आतां मजवर राग करूं नये, अशी त्या ऋषींची विनवणी करूं लागला. **मांडव्यांनीं** त्या राजाला क्षमा केली. मग राजानें त्यांना सुळावरून खालीं उतरवून शूळ उपटून काढण्याचा प्रयत्न केला; पण कांहीं केल्या तो निघेना ! तेव्हां शेवटीं तो शूळ मुळापासून तोडून काढावा लागला ! सुळाचें जें टोंक अंगांत घुसलें होतें, तें तसेंच राहिलें. **मांडव्यांनीं** जन्मभर तें तसेंच वागविलें. तेव्हां-पासून त्यांचें ' **अणीमांडव्य** ' ( अणी म्हणजे सुळाचें बारीक टोंक ) असें नांव पडलें. तपाच्या पुण्याईनें पुढें **मांडव्यांस** स्वर्गाची प्राप्ति झाली. पुढें **मांडव्यांनीं** यमाची गांठ घेतली व त्यास विचारलें कीं, मीं अज्ञानानें किंवा न कळत असें कोणतें पाप केलें कीं, त्याचें हें मला असें फळ मिळालें ? त्यावर यमधर्मानें उत्तर दिलें, लहान-पणीं साळुंकीच्या पंखामध्यें आपण सळई टोंचली होती; त्याचें हें फळ आपल्याला मिळालें. तेव्हां **मांडव्य** म्हणाले, एवढ्याशा लहान अपराधाबद्दल तूं मला फारच कडक शिक्षा दिलीस. यासाठीं मी तुला असा शाप देतों कीं, तूं मृत्युलोकीं

शूद्रजातींत जन्म घेशील. आणि आजपासून मी असा नियम करितों कीं, मनुष्य जन्मल्यापासून चवदा वर्षेंपर्यंत जें कांहीं त्याचे हातून वाईट कृत्य घडेल, त्याची पापांत गणना होऊं नये; कारण, तोंपर्यंत चांगलें काय व वाईट काय, हें ज्ञान त्याला नसतें. त्यानंतर जीं कृत्यें तो करील, त्यांचीं फळें त्याला भोगायला लागावीं. या मांडव्य ऋषींच्या शापामुळें यमधर्म हस्तिनापुरांत विदुराचे जन्मास गेला.

---

## एकलव्य.

कौरव व पांडव या राजपुत्रांना द्रोणाचार्य धनुर्विद्या शिकवीत असत. एकदां भिल्लांच्या राजाचा पुत्र एकलव्य हा त्यांच्याकडे आला, व मला धनुर्विद्या शिकवा, असें म्हणूं लागला. धनुर्विद्येंत कांहीं मंत्र शिकावयाचे असत; एकलव्य हा भिल्ल म्हणजे शूद्र असल्यामुळें त्याला मंत्र

शिकण्याचा अधिकार नव्हता. तेव्हां द्रोणांनीं त्याचें म्हणणें मान्य केलें नाहीं. म्हणून तो अरण्यांत परत गेला; आणि द्रोणाचार्यांचा एक मातीचा पुतळा करून व त्यालाच आपला गुरु समजून त्याच्या समक्ष तो धनुर्विद्येचा अभ्यास करूं लागला. गुरूला जसा मान द्यावयाचा, तसाच तो त्या पुतळ्याला देत असे. मानलेल्या गुरूवर अत्यंत भक्ति ठेवून तो काळजीनें अभ्यास करीत असल्यामुळें कांहीं दिवसांनीं तो त्या विद्येंत फार प्रवीण झाला. एकदां कौरव व पांडव हे त्या भिल्लांच्या अरण्यांत शिकारीस गेले असतां त्यांचा कुत्रा एकलव्याचे अंगावर भुंकूं लागला. तेव्हां एकलव्यानें आपलें धनुष्य सज्ज करून, भुंकतांना कुत्र्याचें तोंड उघडलें असतां अशा शिताफीनें सात बाण मारले कीं, ते त्यांत बोळ्याप्रमाणें जाऊन बसले. पुन्हा कुत्र्याला कांहीं इजा झाली नाहीं. अर्थात् कुत्र्याचें तोंड बंद झालें. ही त्याची धनुर्विद्येंतील कुशलता पाहून कौरव व पांडव यांना मोठें कौतुक वाटलें. त्यांनीं जाऊन ती हकीकत द्रोणाचार्यांना सांगितली. तेव्हां अर्जु-

नाला घेऊन ते तेथें आले. आपले गुरुजी आपल्या घरीं आले, असें पाहून एकलव्यानें त्यांचा अगदीं नम्रतेनें सत्कार केला. मग द्रोणाचार्य म्हणाले, जर तूं मला गुरूच्या ठिकाणीं मानून आपली विद्या पुरी केलीस, तर तूं मला गुरु-दक्षिणा दिली पाहिजे. गुरु मागतील ती दक्षिणा मी देण्यास तयार आहें, असें एकलव्यानें उत्तर केलें. द्रोणाचार्यांनीं त्याच्या उजव्या हाताचा आंगठा कापून मागितला; व गुरुनिष्ठ एकलव्यानें तो त्यांना लागलाच दिला !

---

## विश्वामित्र व नंदिनी.



कान्यकुब्ज ( कनोज ) देशांत गाधि या नांवाचा एक मोठा राजा होऊन गेला. याच्या बापाचें नांव कुशिक. गाधीच्या मागून त्याचा पुत्र विश्वामित्र हा कान्यकुब्ज देशाचा राजा झाला. विश्वामित्र मोठा पराक्रमी होता. एके वेळीं मोठें

सैन्य बरोबर घेऊन तो अरण्यांत शिकार करण्याकरितां गेला. शिकार करितां करितां तो फार थकला व त्याला तहानही लागली. म्हणून त्याच अरण्यांत असलेल्या वसिष्ठऋषींच्या आश्रमांत तो गेला. वसिष्ठांच्या आश्रमांत एक कामधेनु म्हणजे ज्या पदार्थाची इच्छा करावी, तो पदार्थ देणारी एक गाय होती. तिचें नांव नंदिनी. वसिष्ठांच्या इच्छेवरून त्या नंदिनीनें नाना प्रकारचे खाण्याचे व पिण्याचे पदार्थ, वस्त्रें, दागिने वगैरे वस्तु उत्पन्न केल्या. व त्या वस्तूंनीं वसिष्ठांनीं विश्वामित्राचा व त्याच्या सर्व सैन्याचा उत्तम तऱ्हेनें पाहुणचार केला. त्या पाहुणचारानें राजाला फार आनंद झाला. पण अशा ओसाड अरण्यांत वसिष्ठांनीं हें सर्व साहित्य आणलें कोठून, या बुचकळ्यांत तो पडला. शेवटीं तपास केल्यावर त्याला नंदिनीची हकीकत समजली. **दुसऱ्याची चांगली वस्तु पाहिली, कीं मनुष्याला तिचा लोभ सुटतो. पण तो लोभ जर मनुष्यानें तत्काळ विचारानें दाबला नाहीं, तर त्याचें मन त्याजकडून पाप करवितें; व शेवटीं तें पाप**

त्याच्या नाशाला कारण होतें. तसेंच विश्वामित्राचें झालें. त्या धेनूचा त्याला लोभ सुटला. व तो वसिष्ठांना म्हणाला, मी आपल्याला दहा कोटी गाई देतों, अथवा माझें सर्व राज्य देतों; पण एवढी गाय मला द्या. हा मोबदला घेऊन वसिष्ठ आपली गाय देण्याला कबूल होतना. तेव्हां आपल्या पराक्रमाच्या व सैन्याच्या बळावर ती गाय जबरदस्तीनें नेण्याचा त्यानें विचार केला. वसिष्ठ स्वस्थ राहिले. पुढें विश्वामित्राच्या आज्ञेनें त्याचे शिपाई गाईला चाबूक व काठ्या यांनीं मारून हांकून नेण्याचा प्रयत्न करूं लागले. पण गाय कांहीं हालेना! शेवटीं चाबकांचे व काठ्यांचे तडाखे फारच पाठींत बसल्यामुळें ती हंबरडा फोडीत वसिष्ठांजवळ आली व डोळ्यांत आसवें आणून म्हणाली, हे लोक असे माझे हाल करीत असतां आपण तिकडे कांहींच लक्ष देत नाहीं, हें कसें काय? यावर वसिष्ठांनीं उत्तर केलें, नंदिनी, तुझ्या पाठीवर बसत असलेले तडाखे पाहून व तुझा हंबरडा ऐकून माझें अंतःकरण तिळतीळ तुटत आहे. पण मीं काय करूं?

**क्षमा हा ब्राह्मणांचा मुख्य धर्म आहे.** तो मला टाकतां येत नाहीं. मी तुझा त्याग केला नाहीं. **पराक्रम हें क्षत्रियाचें बळ आहे.** त्या बळावर विश्वामित्र तुला नेऊं पाहात आहे. तेव्हां तुला आवडत असेल, तर तूं जा. बरें, तुझ्या मनांत जावयाचें नसेल, तर या वेळीं तूंच आपलें कर्में नें रक्षण कर. अशा रीतीनें वसिष्ठांची आज्ञा मिळतांच नंदिनीनें आपल्या अंगापासून फार मोठें सैन्य उत्पन्न केलें; व त्या सैन्यानें विश्वामित्राचें सैन्य तेव्हांच उधळून लाविलें. तें पाहून विश्वामित्राचा गर्व उतरला व त्याला मोठी लज्जा उत्पन्न झाली. व तो मनांत म्हणाला, **फुकट आहे क्षत्रियांचें बळ ! ब्राह्मणाचेंच तेज खरें !** असें म्हणून त्यानें राज्याचा व एकंदर वैभवाचा त्याग केला; व मोठें तप करून ब्राह्मणत्व मिळविण्याच्या हेतूनें तपश्चर्या करण्याकरितां तो अरण्यांत गेला.

---



# कल्माषपाद राजा.



इक्ष्वाकु वंशांत कल्माषपाद या नांवाचा एक राजा होऊन गेला. तो मोठा पराक्रमी व मानी होता. तो एकदां शिकारीहून रथांत बसून परत येत असतां वसिष्ठऋषींच्या शंभर पुत्रांपैकीं सर्वांत वडील मुलगा शक्ति हा त्याच वाटेनें समोरून येत होता. तेव्हां तो अभिमानी राजा उर्मटपणानें म्हणाला, बाजूला हो. त्यावर शक्तीनें शांतपणें उत्तर केलें, मी वाट सोडणार नाहीं. राजानें ब्राह्मणाला वाट दिली पाहिजे, असें शास्त्र आहे. यावरून दोघांची बोलाचाली सुरू झाली. माघार कोणीच घेईना. अखेर राजाचा राग बेफाम होऊन त्यानें हातांतील चाबकानें शक्तीला मारलें! तेव्हां शक्तीनें त्याला संतापानें शाप दिला कीं, ज्या अर्थी मला ब्राह्मणाला तूं राक्षसाप्रमाणें चाबकानें मारीत आहेस, त्या अर्थी तूं राक्षस होऊन मनुष्यें खात पृथ्वीवर फिरशील. इतक्यांत विश्वामित्र तेथें आला. एकंदर तंटा त्याला समजला.



तूं राक्षस होऊन मनुष्यें खात पृथ्वीवर फिरशील.

[पृ. ६८.]

तेव्हां आपला वैरी वसिष्ठ याचा सूड उगविण्याला ही संधी बरी आहे, असें जाणून विश्वामित्रानें किंकर या नांवाच्या राक्षसाला राजाच्या शरीरांत प्रवेश करण्याला सांगितलें. नंतर तो निघून गेला. आपण ज्याचा अपमान केला, तो वसिष्ठांचा पुत्र शक्ति आहे, असेंही मग राजाला कळलें. व तो त्याला शरण गेला. मग दोघे आपापल्या वाटेनें चालते झाले.जातां जातां आणखी एका ब्राह्मणाचा राजाकडून अपराध झाला. तेव्हां, तूं राक्षस होशील, असा त्यानेंही त्याला शाप दिला. या दुहेरी शापामुळें व त्याच्या अंगांत किंकर राक्षसाचा प्रवेश झाल्यामुळें तो राजा पक्का राक्षस बनून माणसें खात वनांत भटकूं लागला. कांहीं दिवसांनीं शक्तीची व त्याची गांठ पडली. तेव्हां रागानें त्यानें शक्तीला खाऊन टाकलें ! राजाच्या शरीरांत ज्या किंकर राक्षसानें प्रवेश केला होता, त्याला विश्वामित्रानें सांगितल्यावरून त्यानें वसिष्ठांचे बाकीचे सर्व पुत्र असेच मारून खाल्ले. शंभर पुत्रांनीं गजबजलेला आपला आश्रम आतां अगदीं सुना झालेला पाहून वसिष्ठ-

ऋषि दुःखानें अगदीं वेडे होऊन गेले. त्यांनीं दुःखांतून सुटण्याकरितां अनेक वेळा जीव देण्याचे प्रयत्न केले. पण वेळ आल्याशिवाय जीव तरी जातो कसा ! तितक्या सगळ्या प्रयत्नांतून ते केवळ चमत्कारानें वांचले. मग ते आश्रमांत परत आले. तेथें आल्यावर आपली थोरली सून गरोदर आहे, असें त्यांस समजलें. व आपलें कुल कायम राहणार म्हणून त्यांना संतोष वाटून जीव देण्याचे विचार त्यांनीं सोडून दिले.

पुढें एके दिवशीं ते व त्यांची वडील सून हीं अरण्यांत हिंडत असतां कल्माषपाद राजा त्यांस दिसला. व तो लागलाच त्यांना खाऊन टाकण्याकारितां त्यांचे अंगावर धांवला. पण वसिष्ठांनीं त्याला नुसत्या हुंकारानेंच मागें हटविलें; व मंत्राविलेलें पाणी त्याच्या अंगावर टाकून त्याला शापापासून मुक्त केलें. मग वसिष्ठांचे त्यानें आभार मानले. व ब्राह्मणांचा यापुढें मी कधींही अपमान करणार नाहीं, असेंही त्यानें त्यांना वचन दिलें.

वसिष्ठांची वडील सून अदृश्यंती ही योग्य वेळीं बाळंत होऊन तिला मुलगा झाला. त्याचें

नांव पराशर ठेविलें. या पराशराला आपल्या पित्याला मृत्यु कसा आला, ही हकीकत जेव्हां त्याच्या आईकडून कळली, तेव्हां त्यानें सर्व राक्षसांचा संहार करण्याकरितां राक्षससत्र आरंभलें. पण अनेक ऋषींनीं व वसिष्ठांनीं त्याला उपदेश केल्यावरून त्यानें तें सत्र बंद केलें.

---

## वसिष्ठ व विश्वामित्र.

क्षत्रियाचें बल व्यर्थ आहे, असें अनुभवास आल्यावरून विश्वामित्र ब्राह्मणत्व मिळविण्यासाठीं अरण्यांत तपश्चर्येला गेला, असें मागें सांगितलेंच आहे. तेथें गेल्यावर त्यानें उग्र तपाला आरंभ केला. व त्यानें तें तप इतक्या कडक रीतीनें चालविलें कीं, देवांनीं जरी त्याला त्या तपापासून भ्रष्ट करण्याकरितां अनेक खटपटी केल्या, तरी त्यांना न जुमानतां त्यानें आपलें तप शेवटास नेलें. असा तो महातपस्वी झाल्यावर देव त्याला

ब्रह्मर्षि म्हणूं लागले. पण वसिष्ठांनीं आपल्याला ब्रह्मर्षि म्हणावें, ही काय ती त्याची मोठी इच्छा होती. वसिष्ठ तर त्याला ब्रह्मर्षि कांहीं म्हणतना. ते त्याला राजर्षि म्हणत. यामुळें विश्वामित्र त्यांना फारच पाण्यांत पाहूं लागला. वसिष्ठांच्या या द्वेषामुळें त्यानें किंकराकडून त्यांचे शंभर पुत्रही मारविले. तरी वसिष्ठांनीं क्षमा सोडली नाहीं. व विश्वामित्राचें उलट वाईट करण्याचें त्यांनीं मनांतही आणलें नाहीं. विश्वामित्राच्या पाठी-मागें ते त्याची स्तुतिच करीत. विश्वामित्रासारखें कडक तप कोणालाही व्हावयाचें नाहीं, असेंही ते म्हणत. कधीं कधीं विश्वामित्राच्या पाठीमागें ते त्याला ब्राह्मणही म्हणत; पण त्याच्या तोंडावर त्यांनीं त्याला तसें कधीं म्हटलें नाहीं. असा दोघांचा पीळ बरेच दिवस चालला होता. शेवटीं वसि-ष्ठांविषयींचा याच्या मनांतील द्वेष कितपत कमी झाला आहे, हें पाहण्याच्या हेतूनें एक दिवस यमधर्मानें वसिष्ठांचें रूप घेतलें, व तो विश्वामि-त्राकडे येऊन कांहीं खाण्यास मागूं लागला. विश्वामित्रानें लागलेंच अन्न तयार केलें व तो

वसिष्ठांचें रूप घेतलेल्या यमधर्माला पाहूं लागला. पण तो कोठेंच दिसेना ! तेव्हां वसिष्ठ येतपर्यंत आपणही अन्नाला शिवावयाचें नाहीं, असा निश्चय करून विश्वामित्र स्वस्थ बसला. तें पाहून यमधर्माला संतोष वाटला. मग त्यानें येऊन भोजन केलें, व त्यास ब्रह्मर्षि म्हटलें. ही हकीकत वसिष्ठांना समजली, तेव्हां त्यांनाही आनंद झाला. व शेवटीं त्यांनींही त्याला ब्रह्मर्षि म्हटलें. त्यामुळें पुढें दोघांचें फार सख्य झालें.

---

## वडवानळ.

समुद्राच्या पोटात वडवानळ या नांवाचा एक अग्नि आहे, असें म्हणतात. तो वडवानळ तेथें आला कसा, याविषयींची गोष्ट अशी आहे:—

कृतवीर्य या नांवाचा एक राजा होता. भृगुऋषि त्याचे उपाध्याय. एकदां कृतवीर्यानें मोठा यज्ञ केला व त्यांत ब्राह्मणांला सुग्रास अन्न व विपुल द्रव्य देऊन तृप्त केलें. कांहीं दिवसांनीं

कृतवीर्य मरण पावला. नंतर कार्तवीर्यांना म्हणजे कृतवीर्याचे पुत्रांना पैशाची टंचाई पडली. आपल्या बापानें दिलेलें विपुल धन भार्गवांजवळ म्हणजे भृगुऋषींचे वंशजांजवळ आहे, हें त्यांस माहीत होतें. तेव्हां तें धन त्यांचेपासून उपटावें, असा त्यांनीं विचार ठरविला. त्याप्रमाणें ते त्यांचे आश्रमांत आले. कार्तवीर्यांचे भीतीनें कित्येकांनीं आपलें धन जमिनींत पुरलें; कित्येकांनीं दान करून टाकलें, व कित्येकांनीं तें मुकाट्यानें कार्तवीर्यांचे स्वाधीन केलें. सर्वांनीं आपलें धन आपणांस दिलें नाहीं, हें पाहून कार्तवीर्य रागानें सर्व भार्गवांचा सरसकट नाश करूं लागले. तेव्हां भार्गवांच्या स्त्रिया भीतीनें हिमालयाच्या दऱ्याखोऱ्यांत जाऊन लपून बसल्या. त्यांपैकीं एकीनें वंश कायम राहावा म्हणून एक मोठा तेजस्वी गर्भ आपल्या ऊरूंत म्हणजे मांडीत दडवून ठेविला. ही बातमी दुसऱ्या एका स्त्रीनें कार्तवीर्यांस जाऊन सांगितली. त्यांनीं आश्रमांतील सर्व भूमि खणली, तेथें लपवून ठेविलेलें सर्व द्रव्य घेतलें, व नंतर ते हिमालयांत आले. सर्व भार्गवांचा नाश करण्याचा

त्यांचा निश्चय होता; तेव्हां लपविलेल्या गर्भाचा शोध करण्याकरितां ते त्या स्त्रीजवळ आले. पण तिचें विलक्षण तेज पाहून ते दिपले; इतक्यांत तिच्या ऊरूंतील गर्भ तिची मांडी फोडून बाहेर आला ! त्याचें तेज एवढें होतें कीं, त्यानें त्या सर्व राजांचे डोळे जाऊन ते आंधळे झाले, व अगदीं दीन होऊन गेले. **मनुष्य आपल्या पराक्रमाच्या धुंदीनें बेफाम होऊन घोर कृत्यें करूं लागला, कीं परमेश्वर त्याच्या डोळ्यांत भयंकर संकटाचें अंजन घालून त्याला ताळ्यावर आणण्याची तजवीज करितोच.** असें जर त्यानें केलें नाहीं, तर जगाची राहाटी नीट चालावयाची नाहीं. येथेंही कार्तवीर्याचे बाबतींत त्यानें तेंच केलें. असो.

और्वाच्या ( ऊरूंतून म्हणजे मांडींतून निघाला म्हणून त्याचें नांव और्व ) केवळ तेजानें आपली अशी अवस्था झाली, हें पाहून ते सर्व राजे त्या स्त्रीला शरण आले, व आमची दृष्टि आम्हांस कृपा करून दे, आम्ही मुकाट्यानें परत जातों, अशी मुठींत नाक धरून तिची विनवणी करूं

लागले. तेव्हां ती म्हणाली, मी तुमच्यावर रागावल्यें नाहीं; व तुम्हांस आंधळेही केलें नाहीं. तुम्ही भृगुकुलांतील स्त्रियांच्या गर्भांचाही नाश करूं लागलां, तेव्हां भीतीनें हा गर्भ मीं शंभर वर्षें ऊरूमध्यें लपवून ठेविला. भृगुवंशाचे कल्याणासाठीं वेदांनीं आपण होऊन आपलें ज्ञान त्याला तेथेंच करून दिलें! आपल्या बांधवांचा तुम्हीं केलेला संहार ऐकून तुमचा सूड उगविण्यासाठीं या माझ्या पुत्रानें तुम्हांस अंध केलें आहे. तेव्हां तुम्ही त्याचे पाय धरा म्हणजे तुमची दृष्टि येईल. त्याप्रमाणें ते सगळे और्वाला शरण गेले, तेव्हां त्यांची दृष्टि आली. मग ते आपल्या राज्यांत परत गेले.

तथापि आपल्या कुलाचा संहार कार्तवीर्यांनीं केला, याबद्दल सूड उगविण्याचा निश्चय और्वाच्या मनांतून ढळेना. तो आपल्या तेजानें कार्तवीर्याबरोबर सर्व क्षत्रियांचा नाश करूं लागला. तेव्हां त्याचे पितर स्वर्गांतून त्याजकडे येऊन त्याची समजूत करूं लागले. और्व त्यांचें म्हणणें पहिल्यानें ऐकेना. तो म्हणाला, मी आपली प्रतिज्ञा खोटी होऊं देणार नाहीं. ती खोटी होऊं दिली, तर

माझाच नाश होईल. माझ्या कुलाचा यांनीं नाश चालविला, तेव्हां माझ्या नातेवाईकांचा शोक, मी मातेच्या गर्भांत असतां, मला ऐकूं आला. त्या वेळींच सर्व क्षत्रियांचा संहार करण्याची मीं प्रतिज्ञा केली. इतर राजांस सामर्थ्य असून ज्या अर्थी त्यांनीं माझ्या कुलाचें रक्षण केलें नाहीं, त्या अर्थी त्या सर्व क्षत्रियांचा नाश झालाच पाहिजे. **अंगीं सामर्थ्य असून जो पुरुष जाणूनबुजून पापी पुरुषाला पाप करितांना अडथळा करीत नाहीं, त्या पुरुषाला तेंच कर्म हातून केल्याचें पातक लागतें.** तुम्ही सर्व लोकांच्या हिताची गोष्ट सांगतां, हें खरें आहे. पण मी तरी काय करूं? मीं जर आपला राग आंवरून धरिला, तर तो माझेंच भस्म करील. अशा स्थितींत मीं काय करावें, तुम्हीच सांगा. नंतर पितरांच्या सांगण्यावरून त्यानें आपला क्रोधाग्नि समुद्रांत टाकला. हाच अग्नि पुढें घोड्यासारखें डोकें धारण करून वडवानळ झाला. व तेव्हां-पासून तो आपल्या तोंडांतून निघणाऱ्या अग्नीच्या योगानें समुद्राचें पाणी पिऊं लागला.

# सुंद व उपसुंद.



हिरण्यकशिपु नांवाच्या दैत्याच्या कुळांत निकुंभ या नांवाचा एक दैत्य होऊन गेला. त्याला दोन मुलगे होते. एकाचें नांव सुंद व दुसऱ्याचें नांव उपसुंद. ते दोघेही मोठे पराक्रमी व दुष्ट होते. दोघे अगदीं एक विचारानें चालत. त्यांचें एकमेकांवर अत्यंत प्रेम असल्यामुळें ते निरंतर एकत्र बसत, एकत्र उठत, एकत्र निजत, एकत्र जेवीत व एकमेकांच्या सुखासाठीं अगदीं मनापासून झटत. त्यांचा स्वभाव व आचारविचार अगदीं सारखे होते. असा दोघांत सारखेपणा असल्यामुळें असें वाटे कीं, हे दिसायलामात्र दोन, बाकी अगदीं एकच आहेत. एकदां या दोन्ही भावांच्या मनांत असा विचार आला कीं, आपण त्रैलोक्य जिंकून त्यावर राज्य करावें. हा हेतु तडीस नेण्याकरितां ते विंध्यपर्वतावर गेले व कडक तप करूं लागले. त्यांनीं इतकें उत्तम तप चालविलें कीं, त्यामुळें देवांनाही भीति वाटूं लागली.

म्हणून त्यांना त्या तपापासून भ्रष्ट करण्याकरितां देवांनीं अगदीं शिकस्त केली. पण त्यांचे सर्व प्रयत्न वायां गेले. शेवटीं त्यांच्या तपानें प्रसन्न होऊन ब्रह्मदेवानें त्यांना असा वर दिला कीं, तुम्हां परस्परांशिवाय तुम्हांला जगांत कोणापासूनही भय नाहीं. या वरानें निर्भय झाल्यावर त्यांनीं पहिल्यानें तिन्ही लोक जिंकले. ऋषींचे सारे आश्रम व यज्ञशाळा यांचा विध्वंस करून तपस्वी लोकांची कत्तल चालविली. त्यांच्या त्रासानें सगळे लोक अगदीं गांगरून गेले. लोकांचे उद्योगधंदे बसले, व्यापार बंद पडला, धर्मकर्में होतनाशीं झालीं; एकंदरींत सर्व जग अगदीं भयाण दिसूं लागलें! असा जेव्हां जिकडे तिकडे हाहाकार उडाला, तेव्हां देव व ऋषि यांच्या विनंतीवरून ब्रह्मदेवानें तिलोत्तमा नांवाची एक अप्सरा त्या दोघांत भांडण लावण्याकरितां पाठवून दिली. **तपानें किंवा दुसऱ्या पुण्यकृत्यांनीं जें अंगीं सामर्थ्य येतें, त्याचा जर माणसानें भलताच उपयोग केला, तर त्याच्या पदरचा पुण्याचा सांठा नाहींसा होतो, इतकेंच नव्हे, तर**

अल्प निमित्तानें त्याचा तत्काळ नाश होतो. सुंद व उपसुंद यांचा असाच परिणाम झाला. संपत्ति व वरामुळें आलेली निर्भयता यांमुळें ते नेहमीं सुखांत गुंग असत. एक दिवस असेच ते दारू पिऊन अरण्यांत क्रीडा करीत असतां तिलोत्तमा तेथें गेली. तिला पाहिल्याबरोबर तिच्याकरितां दोघांत तंटा लागून तो विकोपास गेला. अखेर दोघांची मारामारी सुरू होऊन तींत दोघेही मरून पडले !

---

## अग्नीचें अजीर्ण.

---

श्वेतकि या नांवाचा एक राजा होता. तो मोठा पराक्रमी व विचारी असे. तो नेहमीं यज्ञ करी. पुढें पुढें तर त्याला यज्ञांचा इतका नाद लागला कीं, त्याला त्यांवांचून दुसरें कांहीं सुचतच नसे. यज्ञांचा रोज धूर लागल्यामुळें ब्राह्मणांचे डोळेही बिघडूं लागले. कितीही दक्षिणा दिली, तरी शेवटीं त्याला ब्राह्मण कोणी मिळेना !



तिला पाहिल्याबरोबर तिच्याकरितां दोघांत तंटा लागला.

[ पृ. ८०. ]

मग त्यानें शंकराला प्रसन्न करून घेण्याकरितां मोठें तप केलें. शंकर प्रसन्न होऊन त्याला वर देण्यास तयार झाले. आपण स्वतः येऊन माझें यज्ञकर्म करावें, असा त्यानें त्यांच्याजवळ वर मागितला. तेव्हां शंकरांनीं स्वतां येण्याचें नाकारलें, पण त्यांनीं त्याला असें सांगितलें कीं, बारा वर्षेंपर्यंत तूं सारखी तुपाची धार अग्नीवर चालू ठेवशील, तर दुर्वासऋषि तुझें यज्ञकर्म करितील. त्याप्रमाणें त्यानें केलें. पण त्याचा परिणाम अग्नीला भोगावा लागला! त्या तुपानें त्याला अजीर्ण झालें! त्याच्या तोंडाची चव गेली! तो निस्तेज झाला! हें अजीर्ण नाहींसें होण्याकरितां अनेक प्राण्यांची चरबी खाल्ली पाहिजे, असें ब्रह्मदेवानें त्याला सांगितलें. तेव्हां अग्नीनें खांडववन खाऊन टाकण्याचा बेत केला. पण इंद्र त्याचा बेत सिद्धीस जाऊं देईना. शेवटीं श्रीकृष्ण व अर्जुन यांचें साहाय्य मिळवून त्यानें आपला हेतु तडीस नेला.

---

# अर्जुन व सुभद्रा.

सुभद्रा ही श्रीकृष्णाची धाकटी बहीण. ती लग्नाला योग्य झाली, तेव्हां ती दुर्योधनाला द्यावी, असा विचार श्रीकृष्णाचा मोठा भाऊ बळराम यानें ठरविला. हा बेत श्रीकृष्णाला पसंत नव्हता. ती अर्जुनाला द्यावी, असें त्याच्या मनांत होतें. आपलें लग्न अर्जुनाशींच व्हावें, असें सुभद्रेलाही वाटत होतें. पण बळरामापुढें कोणाचाच इलाज चालेना. इतक्यांत अर्जुन यात्रा करीत करीत द्वारकेजवळील प्रभास या नांवाच्या तीर्थाला आला. तेथें श्रीकृष्णाची व त्याची गांठ पडली. व त्यानें त्याला द्वारकेला नेलें. तेथें गेल्यावर श्रीकृष्णाच्या विचारानें अर्जुन सुभद्रा मिळविण्याकरितां, खोटा संन्यासी बनला, व द्वारकेजवळील एका पर्वताच्या गुहेंत जाऊन बसला. घेतलेल्या सोंगाची बतावणी अर्जुनानें इतकी उत्तम केली कीं, लवकरच त्याची जिकडे तिकडे ख्याति झाली. हजारों लोक त्याच्या दर्शनाला लोटूं

लागले. होतां होतां या यतिमहाराजांची कीर्ति बळरामाच्या कानांवर गेली. तोही त्यांच्या दर्शनाला गेला. स्वामींचा तो थाट पाहून त्याचीही मति गुंगली. तो त्यांच्या भजनीं लागला. शेवटीं त्यानें त्यांना आपल्या घरीं आणून ठेविलें. इतकेंच नव्हे, तर सुभद्रेला त्यांच्या सेवेला लाविलें. कांहीं दिवसांनीं एक पर्वणी आली. तेव्हां सर्व लोक तीर्थावर स्नान करण्याकरिता निघाले. बळरामानें स्वामीनाही येण्याबद्दल आग्रह केला. स्वामी-महाराज त्याप्रमाणें निघाले. त्यांनीं सुभद्रेच्याच रथांत बसावें, अशी व्यवस्था श्रीकृष्णानें पूर्वींच करून ठेविली होती. योग्य संधी साधून सुभद्रे-सह अर्जुनानें पळून जावें, असें श्रीकृष्णाच्या विचारानें दोघांत ठरलें होतें. त्याप्रमाणें अर्जुनानें संधी मिळतांच रथ इंद्रप्रस्थाकडे हांकला !

ही बातमी बळरामाला कळतांच त्यानें यति-महाराजांचा पाठलाग करण्याकरिता सैन्य पाठविलें. पण त्या सर्व यादवांना अर्जुनानें पळवून लाविलें. तेव्हां तो संन्यासी नसून अर्जुन आहे, असें त्यांना समजलें. व त्यांनीं येऊन बळरामाला

तसें सांगितलें. तेव्हां बळराम फारच संतापला, व आपल्याला फसविल्याबद्दल अर्जुनाची खोड मोडण्याकरितां स्वतः जाण्यास तयार झाला. तेव्हां श्रीकृष्ण त्याची समजूत करून म्हणाला, सुभद्रेला अर्जुनासारखा पति कोठें मिळणार आहे? अर्जुनाला युद्धामध्यें जिंकणार तरी कोण? आपला पराभव करून जर त्यानें सुभद्रा नेली, तर आपणां यादवांची अपकीर्ति होईल. बरें, आपण त्याला शासन केलें, तर कुंतीला म्हणजे आपल्या आतेला काय वाटेल बरें? हें त्याचें भाषण ऐकून बळरामाचें समाधान झालें. मग अर्जुनाला मोठ्या थाटानें आणून बळरामानें मोठ्या प्रेमानें त्याला सुभद्रा दिली.

---

# तीन ऋणें.



मंदपाल या नांवाचे एक मोठे धार्मिक ऋषि होते. त्यांनीं वेदांचा उत्तम अभ्यास केला, चांगलें तपही आचरलें व पुढें ते एक दिवस मरून गेले.

पुढें ते पितृलोकाला गेले; पण तेथें त्यांना अटकाव झाला. तेव्हां यमधर्माला त्यांनीं तसें होण्याचें कारण विचारलें. त्यावर यमधर्मानें सांगितलें कीं, मनुष्य जन्माला आला म्हणजे त्याच्या डोक्यावर तीन ऋणांचा बोजा असतो;—ऋषींचें ऋण, देवांचें ऋण व पितरांचें ऋण. त्यानें वेदांचा पूर्ण अभ्यास केला कीं, ऋषींचें ऋण फिटतें; यज्ञ, तप वगैरे धार्मिक कर्में केलीं कीं, देवांच्या ऋणाची फेड होते; व त्याला पुत्र झाला कीं, पितरांच्या ऋणांतून तो मुक्त होतो. आपण वेद पढलां, यज्ञ व तप आपल्या हातून घडलें; पण आपण लग्न केलें नाहीं, त्यामुळें आपणांस पुत्रही झाला नाहीं; तेव्हां तिसरें म्हणजे पितरांचें ऋण आपल्या शिरावर अद्याप आहे. तें ऋण फिटल्यावांचून आपल्याला पितृलोकाचें सुख मिळावयाचें नाहीं. अशी हकीकत ऐकून मंदपाल ऋषींना फार वाईट वाटलें. व त्यांना तेवढ्याकरितां मृत्युलोकीं पुन्हा यावें लागलें. लवकर पुत्र व्हावा, या हेतूनें त्यांनीं पक्ष्याचा जन्म घेतला. तेथें त्यांना चार पराक्रमी पुत्र होऊन त्यांचे मनोरथ पूर्ण झाले.

# जरासंधाचा वध.



बृहद्रथ या नांवाचा मगध देशाचा एक राजा होता. त्याला सगळीं सुखें अनुकूळ होतीं; पण पोटीं पुत्र नसल्यामुळें तो फार कष्टी असे. पुढें आपल्या दोन राण्यांना घेऊन तो चंडकौशिक या नांवाच्या एका ऋषीच्या दर्शनाला गेला. त्या ऋषीनें प्रसन्न होऊन त्याला एक आंबा दिला. राजानें घरीं आल्यावर त्या आंब्याच्या दोन फांकी करून आपल्या दोन राण्यांना दिल्या. कांहीं दिवसांनीं दोन्ही राण्या गरोदर राहिल्या. पुढें त्या योग्य वेळीं बाळंत झाल्या; पण चमत्कार असा कीं, त्या प्रत्येकीला जें मूल झालें, त्याचें शरीर आपलें अर्धेंच ! हें पाहून सर्वांना वाईट वाटलें. पण करतात काय ! तीं विद्रूप अर्धीं शरीरें दासींनीं नेऊन चवाठ्यावर टाकलीं. नंतर जरा नांवाची एक राक्षसी तीं छकलें उचलून घेऊन जाऊं लागली. व नेण्याला सुलभ पडावीं म्हणून तिनें तीं एकत्र जुळविलीं. तों काय चम-

स्कार सांगावा! एकमेकांला लागतांच तीं जडून त्यांचें एक जिवंत मूल झालें व तें रडूं लागलें! मग राक्षसीनें तें मूल राजवाड्यांत आणून दिलें. सर्वांना मोठा आनंद झाला. जराराक्षसीनें तें मूल सांधलें म्हणून त्याचें नांव जरासंध असें ठेविलें. हा जरासंध मोठा प्रतापी निघाला. तो मोठा झाल्यावर बृहद्रथानें त्याला गादीवर बसविलें व आपण तप करण्याकरितां अरण्यांत निघून गेला. बापाचे गादीवर बसल्यावर त्यानें तपश्चर्या करून शंकराला प्रसन्न करून घेतलें; व त्याच्या कृपेच्या जोरावर ८६ राजांना जिंकून त्यानें कैदेंत टाकलें. आणखी चवदा राजे जिंकून झाल्यावर एक मोठा यज्ञ करून त्या यज्ञांत त्या शंभर राजांस बळी द्यावें, असा त्याचा विचार होता. इतक्यांत युधिष्ठिरानें राजसूय यज्ञ करण्याचा बेत मनांत आणला. तेव्हां श्रीकृष्णानें युधिष्ठिराला असा सल्ला दिला कीं, जरासंध फार प्रबळ झाला आहे. सर्व राजे त्याला थरथर कांपत आहेत. त्याच्या भयानें आम्ही यादव मथुरा सोडून द्वारकेस जाऊन राहिलों आहों. मी कंसाचा वध

केल्यापासून तो तर मला अगदीं पाण्यांत पाहात आहे. कारण कंसाची बायको ती जरासंधाची मुलगी. तेव्हां या जरासंधाचा कांटा वाटेंतून काढल्यावांचून यज्ञ निर्विघ्नपणें सिद्धीस जाणार नाहीं. त्याला मारून सर्व राजांची जर आपण सुटका केली, तर त्यांचें यज्ञाच्या कामीं आपल्याला आयतें साहाय्य मिळेल. तेव्हां मी, भीम व अर्जुन असे तिघे जाऊन पहिल्यानें त्याला मारून येतों. जरासंधाच्या जबड्यांत तिघांनींच जावें, ही गोष्ट युधिष्ठिरास पहिल्यानें रुचेना. पण श्रीकृष्णानें त्याची समजूत घातल्यावर तो त्या गोष्टीला मान्य झाला. मग श्रीकृष्ण, भीम व अर्जुन यांना बरोबर घेऊन मगध देशाला गेला. त्या तिघांनींही ब्राह्मणांचे वेष घेतले होते. जरासंधाच्या नगरांत शिरतांच त्यांनीं रस्त्यांत बरीच पुंडाई केली. अखेर ते राजवाड्यांत पोंचले. जरासंधानें, ते ब्राह्मण आहेत, असें समजून त्यांचा चांगला सत्कार केला. पण त्यांच्या एकंदर लक्षणांवरून ते ब्राह्मण नसावे, असा त्याला संशय आला. तेव्हां तुम्ही खरे कोण आहां, व राज-

रस्त्यांत अशी पुंडाई कां केली, असें त्यानें त्यांस विचारलें. त्यावर श्रीकृष्णानें सांगितलें कीं, आम्ही तुझे शत्रु आहों. तूं ८६ निरपराधी राजांस कैदेंत टाकलेंस, या तुझ्या अपराधाबद्दल तुला शासन करण्याचा आमचा विचार आहे. तेव्हां त्या राजांना मुकाट्यानें सोडून दे; नाहीं तर आम्हां तिघांपैकीं वाटेल त्याच्याशीं युद्ध कर. नंतर भीमाचें व त्याचें युद्ध होण्याचें ठरलें. तें दोघांचें युद्ध सारखें तेरा दिवस चाललें होतें. अखेर चवदावे दिवशीं भीमानें त्याची तंगडी धरून व त्याला उभा चिरून दोन छकलें सरळ फेंकून दिलीं. पण तीं पुन्हा जडून जिवंत झालीं. तेव्हां भीम घाबरला. त्याला कसें मारावें, हें त्याला समजेना. शेवटीं श्रीकृष्णाच्या सूचनेवरून त्यानें डाव्या हातांतलें छकल उजवीकडे व उजव्या हातांतलें डावीकडे टाकलें, तेव्हां तो मेला. मग श्रीकृष्णानें जरासंधाच्या मुलास त्याच्या गादीवर बसविलें, कैदेंतील राजांची सुटका केली व मग ते तिघे इंद्रप्रस्थास परत आले.

---

# शिशुपालाचा वध.



चेदिवंशांत दमघोष या नांवाचा एक राजा होऊन गेला. शिशुपाल हा त्याचा मुलगा. हा जन्मला तेव्हां त्याला तीन डोळे व चार हात होते. जन्मल्याबरोबर हा गाढवासारखा ओरडला. असल्या कुरूप व अपशकुनी मुलास त्याची आई म्हणजे श्रीकृष्णाची आत्या लागलीच टाकून देणार होती. पण इतक्यांत अशी आकाशवाणी झाली कीं, या मुलाला टाकूं नकोस. हा पुढें मोठा बलाढ्य होणार आहे. ज्याच्या मांडीवर याला ठेविलें असतां याचे दोन हात गळून पडतील व याच्या कपाळावर असलेला तिसरा डोळा आंतल्या आंत जिरून जाईल, त्याच्याच हातून याचा मृत्यु आहे, असें समज.

नंतर त्या विद्रूप मुलाला पाहण्यासाठीं आलेल्या हजारों राजांच्या मांडीवर त्याला ठेविलें, पण आकाशवाणीचा दाखला कांहीं येईना. पुढें आपल्या आतेला भेटण्यासाठीं श्रीकृष्ण तेथें

आला. तेव्हां तिनें शिशुपालास त्याचे मांडीवर ठेविलें; तोंच त्याचा तिसरा डोळा नाहींसा होऊन दोन हात गळून पडले. त्यामुळें श्रीकृष्णाच्या हातून आपल्या मुलाचा मृत्यु आहे, असें जाणून शिशुपालाची आई त्याला म्हणाली, शिशुपालाचे अपराध पोटांत घालीन, असें तूं मला वचन दे. तेव्हां त्यानें त्याचे शंभर अपराध पोटांत घालीन, असें आपल्या आतेला वचन दिलें.

पुढें शिशुपालानें श्रीकृष्णाचे अनेक अपराध केले. श्रीकृष्ण द्वारकेंत नसतांना त्यानें ती नगरी जाळून टाकली. श्रीकृष्णाचा पिता वसुदेव यानें एकदां यज्ञ केला, तेव्हां यज्ञाचा घोडा पळवून नेऊन त्यानें त्यांत विघ्न आणलें. कांहीं यादवांच्या बायकांची त्यानें विटंबना केली. असे पुष्कळ अपराध झाले.

पण रुक्मिणीचे लग्नाचे बाबतींत शिशुपालाची जी फजिती झाली, ती त्याचे मनांत फारच डांचत होती. कारण रुक्मिणीचा बाप विदर्भ देशाचा राजा भीष्मक याचे मनांत रुक्मिणीला श्रीकृष्णाला द्यावें, असें होतें. रुक्मिणीच्या

मनांतही श्रीकृष्णालाच वरावयाचें होतें. पण तिचा वडील भाऊ रुक्मी हा ऐकेना. त्यानें तिचें लग्न शिशुपालाशीं ठरविलें. लग्नाची तयारी झाली. पण रुक्मिणीनें एका ब्राह्मणाबरोबर श्रीकृष्णाला एक पत्र पाठविलें; व लग्नाचे आदले दिवशीं आम्ही आमच्या कुळाचाराप्रमाणें देवीच्या दर्शनाला जाऊं, त्या वेळीं तेथून सैन्यासह येऊन तूं मला घेऊन जा, असें त्यांत लिहिलें. त्याप्रमाणें श्रीकृष्ण आला व सर्वांचा पराभव करून रुक्मिणीला घेऊन गेला. अशा रीतीनें त्यानें शिशुपालाचे तोंडाला पानें पुसलीं. पण तेव्हांपासून तो श्रीकृष्णावर नुसता जळत होता.

शेवटीं युधिष्ठिरानें राजसूय यज्ञ आरंभला. तिथे अनेक देशांचे राजे आले होते. त्यांत शिशुपालही होता. यज्ञाकरितां जमलेल्या राजांत प्रथम पूजा कोणाची करावयाची असा प्रश्न निघाला. भीष्माच्या संमतीनें तो मान श्रीकृष्णास द्यावा, असें ठरलें. त्याप्रमाणें त्याची पूजा झालीही. पण तें पाहून शिशुपालाच्या पायांची आग मस्तकास गेली. त्यानें यज्ञांत बखेडा माजविण्याची वेळ

आणली. भीष्माला व श्रीकृष्णाला तो हवें तसें टाकून बोलूं लागला. तेव्हां याचे आजपर्यंत शंभरांपेक्षां ज्यास्त अपराध आपण पोटांत घातले, आपण आतां वचनांतून मुक्त आहों, असा विचार करून श्रीकृष्णानें आपल्या सुदर्शन चक्रानें तेथच्या तेथें शिशुपालाचें डोकें उडविलें.

---

## शाल्वाचा वध.



शाल्व हा शिशुपालाचा वडील भाऊ. हा मार्तिकावत देशाचा राजा होता. श्रीकृष्णानें आपल्या धाकट्या भावाला म्हणजे शिशुपालाला मारलें, ही बातमी शाल्वाला कळतांच तो अगदीं संतापून गेला. व तो मोठें सैन्य घेऊन द्वारकेवर चालून आला. श्रीकृष्ण इंद्रप्रस्थास होता, तरी यादवांनीं शाल्वराजाला तोंड देण्याची जोरानें तयारी केली. शहरांत व शहराचे आसपास उत्तम सैन्य ठेवून जिकडे तिकडे अगदीं कडेकोट बंदोबस्त केला. शाल्वही पुष्कळ सैन्य घेऊन नगरांत शिरण्याची खटपट करीत होता. त्यानें बाहेरचे

सर्व रस्ते अगदीं रोखून टाकले होते. पहिल्यानें श्रीकृष्णाचा मुलगा सांब यानें नगराबाहेर येऊन शाल्वाच्या सैन्याशीं लढण्याला आरंभ केला. शाल्वाचा सेनापति क्षेमवृद्धि यास त्यानें बाणांनीं जर्जर करून पळवून लावलें. नंतर वेगवान् या नांवाचा दानव त्याजवर चालून आला; पण त्यालाही सांबानें गदेनें ठार केलें. दुसरीकडे श्रीकृष्णाचा दुसरा मुलगा चारुदेष्ण व विविंध्य दानव यांचें युद्ध चाललें होतें. त्यांत शेवटीं विविंध्य पडला. तेव्हां शाल्व स्वतां पुढें झाला. त्याला पाहून यादवसेना भिऊन गेली. कोणी लढण्याला पुढें झटेना. इतक्यांत प्रद्युम्नानें पुढें होऊन सर्वांना धीर दिला. शाल्वाचें व त्याचें युद्ध जुंपलें. प्रद्युम्न त्या वेळीं विलक्षण शूरपणानें लढला. पुढें शाल्वाच्या बाणानें तो रथांत बेशुद्ध पडला. तेव्हां त्याच्या सारथ्यानें त्याचा रथ मागें नेला. पण तो कांहीं वेळानें शुद्धीवर आल्यावर आपल्या सारथ्याला म्हणाला, काय केलेंस तूं हें? तुझी बुद्धि चळली तर नाहीं? यादवकुळांतला वीर रणांतून कधीं मागें फिरतो का? मी रणांतून मागें

आलों, हें ऐकून सर्व लोक माझा धिक्कार करतील. व धिक्कार हा मरणापेक्षांही अधिक दुःख देणारा आहे. माझ्यावर सर्व भार टाकून गेलेला श्रीकृष्ण उद्यां मला काय म्हणेल ? ने पुन्हा रणाकडे रथ ! यावर सारथ्यानें त्याचा रथ पुन्हा रणांत नेला. तेव्हां प्रद्युम्न दुप्पट शौर्यानें लढूं लागला. अखेर त्यानें शाल्वाला बेशुद्ध पाडलें. ती संधी साधून त्याचें डोकें उडविण्याकरितां प्रद्युम्नानें धनुष्याला बाण लावला. पण इतक्यांत नारदांनीं व वायूनें येऊन त्याला सांगितलें कीं, शाल्वाचा वध तुझे हातून नाहीं, तो श्रीकृष्णाचे हातून आहे. तें ऐकून त्यानें आपला बाण आनंदानें परत ठेवला. इतक्यांत शाल्वही सावध होऊन व विमानांत बसून पळून गेला.

राजसूय यज्ञ आटपून श्रीकृष्ण द्वारकेस परत आला, तेव्हां त्याला शाल्वाच्या स्वारीची व पराजयाची हकीकत समजली. तेव्हां त्यानें शाल्वाचा वध करण्याची प्रतिज्ञा केली. प्रतिज्ञा केल्यावर त्यानें एकदम सौभनगरावर चाल केली. तें नगर आकाशांत उंच असून समुद्रानें वेष्टिलेलें

होतें. श्रीकृष्ण तेथें जातांच यादव व दानव यांचें भयंकर युद्ध सुरू झालें. युद्ध होतां होतां त्यानें तें दानवांचें शहर सुदर्शनचक्रानें मधोमध चिरून टाकलें. व गदेनें शाल्वाचें शिर उडविलें. नंतर आनंदानें श्रीकृष्ण द्वारकेस परतला.

---

## किरात व अर्जुन.

पांडव काम्यक वनांत वनवासाचें दुःख भोगीत असतां त्यांचा असा विचार ठरला कीं, तेरा वर्षें पुरीं झाल्यावर कौरवांशीं युद्ध केल्यावांचून आपलें राज्य आपणांस परत मिळणार नाहीं; तेव्हां त्या युद्धाकरितां इंद्राजवळून दिव्य अस्त्रें आणण्यासाठीं अर्जुनानें जावें. त्या बेताप्रमाणें अर्जुन निघाला. तो हिमालय व गंधमादन हे पर्वत ओलांडून इंद्रकील पर्वतावर आला. तेथें तपश्चर्या केल्यावर इंद्रानें ब्राह्मणाच्या रूपानें त्याला दर्शन देऊन वर देऊं केला. तेव्हां अर्जुनानें त्याजपाशीं स्वर्गांतील दिव्य अस्त्रें

मागितलीं. त्यावर इंद्र म्हणाला, मी प्रसन्न झालों असतां तूं वास्तविक स्वर्ग मागावा; पण तूं अस्त्रें मागतोस हें काय? अर्जुन म्हणाला, अस्त्रें मिळविण्याकरितांच माझ्या भावांनीं मला पाठविलें आहे. **ते वनांत दुःखांत असतां मीं एकट्यानें स्वर्गाचें सुख भोगावें, हें योग्य नाहीं. त्यांच्या आज्ञेपुढें स्वर्गाची ती किंमत काय!** मग इंद्रानें सांगितलें कीं, पहिल्यानें तूं शंकराला संतुष्ट कर, त्यानें तुला दर्शन दिलें कीं, मग मी तुला अस्त्रें शिकवीन. असें बोलून इंद्र गुप्त झाला. तेव्हां शंकराला प्रसन्न करण्याकरितां अर्जुनानें तेथेंच तपाला आरंभ केला. चार महिने कडक तप झाल्यानंतर अर्जुनावर कृपा करण्यापूर्वी त्याची परीक्षा पाहण्याचें शंकरानें मनांत आणलें. त्यानें किराताचा म्हणजे भिल्लाचा वेष घेतला; व अर्जुन जेथें तप करीत होता, तेथें तो आला. इतक्यांत मूक नांवाच्या एका दानवानें रानडुकराचें रूप घेऊन अर्जुनावर चाल केली. अर्जुनानें आपलें धनुष्य सज्ज करून त्या डुकरावर रोंखलें. तेव्हां किरात म्हणाला, या डुकराला पहिल्यानें

मीं पाहिलें आहे; तूं याजवर बाण टाकूं नकोस. पण त्याच्या म्हणण्याकडे लक्ष न देतां अर्जुनानें आपला बाण सोडला. किरातानेंही तसाच बाण सोडला. दोघांचे बाण एकदम लागून तो डुकर लागलाच मरण पावला. जें सावज एकानें हेरलें, त्याजवर दुसऱ्यानें बाण टाकावयाचा नाहीं, असा शिकारीचा नियम असल्यामुळें त्या डुकराबद्दल दोघांत भांडण लागलें. बोलाचाली होतां होतां तंटा विकोपास जाऊन अर्जुन त्या किरातावर बाण सोडूं लागला. पण किरातावर त्याच्या बाणांचा कांहीं परिणाम होईना ! अग्नीनें अर्जुनाला दिलेले अक्षय भातेही रिते पडले. मगमात्र अर्जुन गडबडला. पण धैर्य धरून तो आपल्या धनुष्याचेच प्रहार त्याच्यावर करूं लागला. तों तें धनुष्यच किरातानें गिळून टाकलें ! अर्जुनानें तरवार काढली. तिच्याही तडाख्यांनीं किराताचें कांहीं वांकडें होईना ! शेवटीं तीही मोडून गेली ! तरी अर्जुन डगला नाहीं ! **जो पराक्रमी असतो तो सामुग्री नाहीं म्हणून कधीं निराश होऊन रडत बसत नाहीं. तो प्रयत्नाची शिकस्त**

करितो. प्रयत्न करितां करितां मरूनही जातो. पण हातीं घेतलेल्या कामांत माघार म्हणून घेत नाहीं. असो. अर्जुनानें किराताशीं पुढें बाहुयुद्ध सुरू केलें. पण किरातानें शेवटीं त्याला बेशुद्ध पाडलें. कांहीं वेळानें सावध झाल्यावर त्याला काय करावें, हें सुचेना. तो अगदीं विचारांत पडला. शेवटीं शंकराची आराधना करावी, असें त्यानें ठरविलें. त्यानें एक मातीचें लिंग केलें. व तो त्याची अगदीं भक्तीनें पूजा करूं लागला. तों चमत्कार असा झाला कीं, त्यानें लिंगावर बिल्वपत्र वाहिलें, कीं तें आपलें किराताच्या डोक्यावर जाऊन पडे! तेव्हां तो किरात कोण असावा, हें त्याच्या ध्यानांत आलें. मग त्या किरातरूपी शंकराला तो शरण गेला. अर्जुनाचें शौर्य, धैर्य व भक्ति पाहून शंकराला संतोष झाला. त्यानें त्याला आपलें पाशुपत नांवाचें अस्त्र दिलें, व तो गुप्त झाला. यानंतर वरुण, कुबेर व यम या देवांनींही अर्जुनास दर्शन दिलें. यमानें आपली गदा, वरुणानें आपले पाश व कुबेरानें आपलीं अस्त्रें त्यास दिलीं. इतक्यांत अर्जुनाला

इंद्राकडे नेण्याकरितां इंद्राचा सारथि मातली हा रथ घेऊन तेथें आला. इंद्राकडे गेल्यावर इंद्रानेंही आपलीं अस्त्रें त्याला दिलीं. मग तो आपल्या भावांकडे वनांत परत आला.

---

# नल व दमयंती.



वीरसेन या नांवाचा निषध देशाचा एक राजा होता. त्याला एक मुलगा होता. त्याचें नांव नल. हा नल रूपानें फारच सुंदर होता. जसा रूपानें तसाच तो गुणांनींही सुंदर होता. तो मनानें उदार, शूर, बलवान व सत्य कधींही न सोडणारा असा होता. अश्वविद्येंत तो फार निपुण असून त्यास द्यूताचीही आवड असे. त्याच्या गुणांची, रूपाची व विद्वत्तेची कीर्ति त्या काळीं सर्वत्र पसरली होती. त्या काळीं विदर्भ देशांत भीम या नांवाचा राजा होता. त्याला पहिल्यानें मूलबाळ कांहीं नव्हतें. पण पुढें दमन-ऋषींच्या कृपेनें त्याला, दम, दांत व दमन

असे तीन मुलगे व दमयंती या नांवाची एक मुलगी झाली. ही दमयंतीही रूपानें फारच सुरेख होती. तिच्या सारखी सुरेख स्त्री त्या काळीं कोणीही नव्हती. पुढें निषध देशांतील कांहीं ब्राह्मण विदर्भ देशांत भीमराजाचे दरबारीं गेले. त्यांनीं नलाच्या गुणांचें व रूपाचें वर्णन भीमराजाजवळ केलें. त्या वेळीं दमयंती बापाजवळ बसली होती. तिनें तें वर्णन ऐकलें. तेव्हां नलावर तिचें प्रेम बसलें. दमयंतीच्या गुणांचा व रूपाचा लौकिक नलाच्याही कानांवर गेला. तेव्हां त्याच्या मनांत ती उतरली. याप्रमाणें तीं दोघें एकमेकांना पाहण्याला अगदीं आतुर झालीं होतीं.

एकदां असें झालें कीं, नल मौजेनें बागेंत फिरत होता. त्या बागेंत एक छानसें तळें असून त्या तळ्यांत एक हंसांचा थवा क्रीडा करीत होता. ते हंस सोनेरी वर्णाचे असून मोठे सुंदर व गोजिरवाणे दिसत होते. त्यामुळें त्यांतल्या एका हंसाला धरावें, असें नलाला वाटलें. म्हणून चोरपावलांनीं तो त्या तळ्याकडे जाऊं लागला. इतक्यांत त्याची चाहूल लागून बहुतेक पक्षी

उडाले. एकमात्र त्याचे हातीं लागला. तेव्हां हा आपल्याला मारील, या भीतीनें तो हंस नलाला म्हणाला, राजा, मला मारूं नको. मला मारून तुला काय मिळणार आहे? मात्र तूं जर मला सोडशील, तर मी तुझ्या हिताची गोष्ट करीन. मी दमयंतीकडे जाऊन तुझी अशी स्तुति करीन कीं, ती तुझ्याशिवाय मग कोणालाच वरणार नाहीं. हें त्याचें भाषण ऐकून नलानें त्याला सोडून दिलें. हंसाला अर्थात् मोठा आनंद झाला. स्वतंत्रता मिळाल्यावर कोणाला बरें आनंद होणार नाहीं? असा आनंद जरी त्याला झाला, तरी तो नलाचे उपकार विसरला नाहीं. आपल्या सोब-त्यांना बरोबर घेऊन तो दमयंतीकडे गेला. त्या वेळीं ती आपल्या मैत्रिणींसह बागेंत खेळत होती. ते सुंदर सोनेरी पक्षी पाहिल्याबरोबर ते धरावे, अशी त्यांना इच्छा झाली. त्या त्यांच्या पाठीस लागल्या. नलानें ज्याला जीवदान दिलें होतें, त्याच हंसाला धरण्याकरितां दमयंती धावूं लागली. चाळवीत चाळवीत तिला बरीच दूर नेल्यावर तो हंस मनुष्यासारखा तिच्याजवळ बोलूं लागला.

त्यानें नलाचें रसभरित वर्णन केलें. आणि म्हणाला, तो चांगला आहे, तूंही पण चांगली आहेस. चांगली वस्तु चांगल्या वस्तूजवळ आली, म्हणजे परिणाम चांगलाच होतो. तेव्हां तूं त्याला वरलें, तर तुझें रूप सफळ होऊन दोघांनाही सुख होईल. दमयंतीच्या मनांत तेंच होतें. तेव्हां हंसाचें भाषण तिला फार रुचलें. तूं नलालाही असेंच सांग, असें तिनें हंसाला म्हटलें. हंस मग उडून नलाकडे गेला व झालेलें वर्तमान त्यानें त्याला सांगितलें.

कांहीं दिवस गेल्यावर दमयंतीचें स्वयंवर करण्याचा निश्चय तिच्या बापानें केला. सर्व देशांच्या राजांस व राजपुत्रांस आमंत्रणें गेलीं. स्वयंवराची सगळी तयारी झाली. पृथ्वीवरचे सगळे राजे तिथे गोळा झाले. दमयंतीच्या स्वयंवराची बातमी नारदाच्या तोंडून स्वर्गापर्यंत गेली. तेथें दमयंतीच्या गुणांची व रूपाची वाखाणणी नारदानें पुष्कळ केल्यावरून इंद्र, वरुण, यम, व अग्नि या देवांनींही स्वयंवरास जाण्याचा निश्चय केला. त्याप्रमाणें विमानांत बसून ते कुंडि-

नपुरास म्हणजे विदर्भ देशाच्या राजधानीस यावयास निघाले. वाटेंत नलाची व त्यांची गांठ पडली. त्याचें रूप पाहून ते थक्क झाले. व दमयंती यालाच खास वरणार, असें त्यांस वाटलें. तथापि युक्ति करून नलाला फसविण्याचा त्यांनीं घाट घातला. ते नलाजवळ जाऊन म्हणाले, तूं आमचा दूत होऊन थोडेंसें काम कर. देवांचा डाव न समजल्यामुळें नलानें त्यांचें म्हणणें एकदम कबूल केलें. काम कोणतें, तेंही त्यानें पूर्वीं विचारलें नाही. अशा रीतीनें नलापासून वचन घेतल्यानंतर देवांनी त्याला सांगितलें कीं, आम्ही असे असे चौघे देव असून दमयंतीला वरण्यासाठीं जात आहों. तेव्हां तूं आमचा दूत म्हणून तिच्याकडे जा, व आम्हांपैकीं कोणाला तरी एकाला वरण्याबद्दल तिचें मन वळीव. नलाला मोठी पंचाईत पडली. जिच्या प्राप्तीकरितां आपण जात आहों, तिच्याचकडे जाऊन दुसऱ्याकरितां रदनदली कशी करावी, ही अडचण त्याला वाटूं लागली. पण **कांहीं असलें, कितीही नुकसान सोसावें लागलें, तरी दिलेलें वचन**



दमयंती व तिच्या दासी अगदीं गोंधळून गेल्या.

[ पृ. १०५.

मागें घेणें उचित नव्हे, असा विचार करून तो दमयंतीकडे जाण्यास निघाला. देवांच्या प्रसादानें त्याला कोणास न दिसतां दमयंतीच्या महालांत गुप्तपणें जातां आलें. महालांत गेल्यावर त्याचें सौंदर्य पाहून दमयंती व तिच्या दासी अगदीं गोंधळून गेल्या. त्या त्याच्याकडे नुसत्या टकमक पाहात राहिल्या. नंतर नलानें आपण कोण व कां आलों, हें दमयंतीला सांगितलें. व कोणा तरी देवाला वरण्याबद्दल तिची पुष्कळ समजूत घातली. पण ती ऐकेना. ती म्हणाली, मीं आपल्याला एकदां मनानें वरिलें आहे. आतां तो माझा निश्चय कांहीं झालें, तरी ढळणार नाहीं. आपण जर माझा त्याग कराल, तर मी आपले प्राण ठेव-णार नाहीं. यावर नल म्हणाला, अशा स्थितींत दूत या नात्यानें मला दोष लागणार नाहीं, असा उपाय आतां तूंच काढ. तेव्हां तिनें उत्तर केलें, स्वयंवराच्या ठिकाणीं आपण देवांसह यावें, मग त्या वेळीं त्यांच्या समक्ष मी आपल्याला माळ घालीन; म्हणजे आपल्यावर कांहींच दोष येणार

नाहीं. नल परत गेला व त्यानें झालेली सगळी हकीकत देवांना सांगितली.

स्वयंवराचा दिवस आला. सर्व राजे उत्तम पोषाख करून आपापल्या आसनावर बसले. दमयंती मंडपांत आली. एकेक राजाचें वर्णन ऐकत ती चालली असतां नलासारखें रूप असलेले पांच राजे तिच्या दृष्टीस पडले. यांत खरा नल कोणता हें तिला समजेना. ती अगदीं गोंधळून गेली. विचार केल्यावर हें सगळें देवांचें कपट असावें, हें तिनें ओळखलें. मग देवांना ती शरण गेली. नलावरील तिचें शुद्ध प्रेम पाहून देवांनीं आपलीं खरीं रूपें घेतलीं. तेव्हां नलाला ओळखून तिनें त्याच्या गळ्यांत माळ घातली. व दोघेंही देवांना शरण गेलीं. तेव्हां त्यांनीं नलास आठ वर देऊन ते स्वर्गाला निघून गेले. जमलेले राजेही आपापल्या देशाला गेले. नल व दमयंती यांचें लग्नही मोठ्या थाटानें नंतर झालें. तेथें कांहीं दिवस राहून नल दमयंतीला घेऊन आपल्या राजधानीला आला. व तिच्यासह आनंदानें तो आपला काळ घालवूं लागला. कांहीं

वर्षांनीं त्याला दोन मुलें झालीं. एक मुलगा व एक मुलगी. मुलाचें नांव इंद्रसेन व मुलीचें नांव इंद्रसेना.

इकडे असें झालें कीं, इंद्रादि देव स्वर्गाकडे परत जात असतां वाटेंत त्यांस कलि व द्वापर हे भेटले. ते स्वयंवरालाच येत होते. स्वयंवर झालें, दमयंतीनें नलाला वरिलें, अशी हकीकत त्या चार देवांकडून त्यांना कळली. ती ऐकून कलीला फार राग आला. नलाचा सूड घेण्याचा ते दोघे विचार करूं लागले. शेवटीं दोघांनीं मसलत करून असें ठरविलें कीं, नलाला राज्यावरून दूर करावें, दमयंतीची व त्याची ताटातूट करावी, व अशा रीतीनें दोघांनाही सुखांत राहूं देऊं नये. मग ते दोघे नलाच्या राज्यांत जाऊन राहिले. बारा वर्षें झालीं. नलाकडून चूक होऊन त्याच्या शरीरांत प्रवेश करण्याला कलीला संधी सांपडेना! मनुष्याकडून पाप झालें म्हणजे तो कलीच्या तावडींत सांपडतो, असें आपल्या शास्त्रांत सांगितलें आहे. बारा वर्षांत नलाचे हातून पाप झालें नाहीं; यावरून नलाचें वर्तन किती शुद्ध होतें,

हें दिसून येतें. पुण्यवान् राजांचे यादींत त्याचें नांव पहिलें आहे, तें उगीच नाहीं. **शुद्ध वर्तनाचें तेजच असें असतें कीं, त्याच्याकडे वांकड्या डोळ्यानें पाहण्याची कोणाची छातीच होत नाहीं.** असो. **गोष्ट व्हायचीच असली, म्हणजे चांगल्या मनुष्याचीही बुद्धि चळते.** तसेंच एकदां **नळाचें** झालें. त्यानें लघवी केल्यावर पाय न धुतां नुसती चूळ भरून एकदां संध्या केली. या अमंगळ आचरणानें **कलीला** फावलें. त्यानें तत्काळ त्याच्या शरीरांत प्रवेश केला. **मनुष्याचे आचरणांत अल्प जरी चुकी झाली, तरी तिचे कधीं कधीं घोर परिणाम होतात. तेव्हां त्यानें आपलें प्रत्येक पाऊल अगदीं जपूनच टाकलें पाहिजे.** झालें. **कलीचा** संचार झाल्यावर मग काय पाहिजे ! **नलाची** बुद्धि फिरली ! **नलाचा पुष्कर** म्हणून एक भाऊ होता; **कलीनें** त्याच्या मनांत असें भरवून दिलें कीं, तूं **नलाशीं** द्यूत खेळ, म्हणजे त्याचें राज्य तुला मिळेल. त्याप्रमाणें **पुष्कर नलाकडे** येऊन त्यानें त्याला द्यूताला बोलाविलें. **नलाचें** मन भ्रष्टच

झालें होतें. तेव्हां तो खेळण्याला तयार झाला. पुढें द्यूताला सुरवात झाली. द्वापारानें फांशांत प्रवेश केला होता. तेव्हां प्रत्येक दान नलाला आपलें उलटें पडे. त्याची एकेक वस्तु जाऊं लागली; पण तसतशी त्याची द्यूताची ईर्षा वाढूं लागली. ही बातमी बाहेर फुटतांच सर्वांना वाईट वाटलें. सर्व प्रजाजन त्याच्याकडे धांवत आले; व त्यानें द्यूत खेळूं नये, म्हणून त्यांनीं त्याची पुष्कळ समजूत घातली. पण पालथ्या घागरीवर पाणी! तो मुळींच ऐकेना. दमयंतीनें आपल्या परी सांगितलें, पण कांहीं उपयोग होईना! **वाईट विचारानें एकदां मनुष्याला घेरलें, म्हणजे तो केवळ त्याला पशु बनवितो.** दमयंती त्याला जिवापलीकडे आवडत होती. पण या वेळीं ती त्याला दृष्टीसमोरही नको, असें वाटूं लागलें! सर्वांचा उपाय खुंटला. दमयंतीनें मध्यंतरीं आणखी दोन वेळा द्यूत बंद व्हावें, म्हणून खटपट केली. पण व्यर्थ. अखेर तीही निराश झाली. आपला आतां सर्वस्वीं नाश होणार, हें तिनें ओळखलें. व लागलीच सावधगिरी करून वार्ष्णेय

या नांवाच्या विश्वासू सारथ्याबरोबर तिनें आपलीं दोन मुलें आपल्या माहेरीं पाठवून दिलीं. तीं दोन मुलें कुंडिनपुरास पोंचतीं केल्यावर रथ व घोडे तेथेंच ठेवून वार्ष्णेय अयोध्येस गेला; व तेथील ऋतुपर्ण राजाच्या नोकरीस राहिला.

इकडे पुष्करानें नलाचें सर्वस्व हिरावून घेतलें. तेव्हां अंगावरील सर्व दागिने काढून एका वस्त्रा-निशीं तो वाड्याबाहेर पडला. दमयंतीनेंही तसेंच केलें. तीही सर्व दागिन्यांचा त्याग करून एका वस्त्रानिशीं त्याच्याबरोबर निघाली. तीं दोघें अरण्यांत गेलीं. पण तेथें त्यांचे कोण हाल झाले म्हणतां! त्यांना कांहीं खायला मिळेना! भुकेनें अत्यंत पीडा होऊं लागली! **वैभव हें दुपारच्या सावलीसारखें आहे; तें प्राप्त व्हावें म्हणून मनुष्यानें चांगल्या मार्गानें उद्योग करावा; पण तें मिळाल्यावर त्याचा गर्व कधीं वाहूं नये. वेळ येऊन घटकेंत राजाचा भिकारी केव्हां होईल; याचा नियम नाहीं.** नलाचेंच पहाना! काल राजा तर आज त्याला अन्नाची पंचाईत! असो. दुपारची वेळ झाली,

म्हणजे त्रिभुवन आठवतें, असें म्हणतात. तसेंच नलाचें झालें. भुकेनें प्राण व्याकुळ होऊं लागले, तेव्हां त्याला आपल्या वर्तनाबद्दल वाईट वाटूं लागलें. असेच दुःखांत त्यांचे कांहीं दिवस गेले. पुढें एके दिवशीं त्यांना कांहीं सोनेरी पक्षी दिसले. त्यांना खाण्यासाठीं धरावें, या हेतूनें नलानें आपलें नेसतें वस्त्र त्यांच्या अंगावर टाकलें. तों तें वस्त्र घेऊन पक्षी उडून गेले. **मनुष्य एकदां दुर्दैवाच्या फेऱ्यांत सांपडला, म्हणजे तो आपल्या फायद्याकरितां म्हणून जें जें करितो, तें तें त्याला मारकच होतें.** तसेंच इथे नलाचें झालें. वास्तविक ते खरे पक्षी नव्हते. द्यूतांतील फांशांनींच त्याचें एक राहिलेलें वस्त्र हिरावून घेण्याकरितां पक्ष्यांचीं रूपें घेतलीं होतीं. वस्त्र गेल्यावर नल उघडा पडला. तेव्हां दमयंतीनें आपलें अर्धें वस्त्र त्याला नेसायला दिलें. अशा रीतीनें आपल्या दुःखांचा कळस झालेला पाहून तो दमयंतीला म्हणाला, संकटें तर केवळ हात धुऊन माझे पाठीस लागलीं आहेत. याकरितां मी एक तुला हिताची गोष्ट सांगतों,

तेवढी तूं ऐक. हा रस्ता अवंतीकडे जात आहे. हा दुसरा कोसला नगरीकडे जात आहे. हा विंध्य पर्वत व ही पयोष्णी नदी. हा रस्ता विदर्भ देशाकडे जात आहे. हा त्याच्या भाषणाचा रोंख पाहून आपण आपल्या माहेरीं निघून जावें, असा त्याचा हेतु ती उमजली. तेव्हां तिला फारच वाईट वाटलें. तिचा कंठ भरून आला. डोळ्यांतून आसवें गळूं लागलीं. शेवटीं ती दुःखानें म्हणाली, काय महाराज बोलतां आपण हें ? आपण संकटांत असतां आपल्याला टाकून मी एकटी माहेरीं जावें, असें आपल्या मनांत तरी कसें येतें म्हणत्यें मी ? दुखणेकऱ्याला जितका औषधाचा उपयोग, तितकाच संकटांत पडलेल्या पुरुषाला त्याच्या पतिव्रता भार्येचा असतो. त्यांतून मीं माहेरीं जावें अशी आपली इच्छा असेल, तर चला आपण दोघेंही जाऊं. पण अशा दीनवाण्या स्थितींत सासुरवाडीस जाणें नलाला अर्थात् रुचलें नाहीं. नंतर भुकेनें व तहानेनें पीडलेलीं अशीं तीं अरण्यांतून भटकत असतां त्यांना एक धर्मशाळा दिसली, तेथें तीं

जाऊन बसलीं. फार थकल्यामुळें दोघांनाही लागलीच तिथच्या तिथे झोंप लागली. दुःखानें मन शांत नसल्यामुळें नल लवकरच जागा झाला, तेव्हां त्याच्या मनांत पुढील विचार येऊं लागले:- आपलें राज्य गेलें, मित्रांनीं आपल्याला सोडलें, प्रजा आपल्या उपयोगीं पडली नाहीं; आणि या वनांत तर आपले असे हाल चालले आहेत. आणखी पुढें दुर्दैवानें काय वाढून ठेविलें आहे, कोणीं सांगावें ! अशा दीन स्थितींत जगण्यापेक्षां मरून जावें हें बरें, असें एकदां त्याला वाटे. एकदां त्याचे असें मनांत येई कीं, या दमयंतीला सोडून आपण कुठे तरी चालतें व्हावें. म्हणजे आपोआप ती माहेरीं निघून जाईल व माझ्यासाठीं त्या बिचारीला जे विनाकारण कष्ट सोसावे लागत आहेत, त्यांतून ती सुटेल. असा विचार करितां करितां केवळ कलीच्या प्रभावामुळें दमयंतीला त्या भयाण अरण्यांत सोडून जाण्याचा दुष्ट विचार त्यानें कायम केला. तीं दोघें एकच वस्त्र नेसलीं होतीं, तेव्हां तेथेंच दुर्दैवानें सांपडलेल्या एका तरवारीनें अर्धें वस्त्र फाडून

घेऊन व तिला तेथेंच एकटीला निजलेली सोडून तो चालता झाला !

नल निघून गेल्यानंतर कांहीं वेळानें दमयंती जागी झाली. पहाते तों आपलें वस्त्र फाडलेलें असून नलही जवळ नाहीं. तेव्हां ती घाबरली. जवळपास कोठें नल गेला असेल, या आशेनें तिनें त्याचा पुष्कळ तपास केला; पण कांहीं उपयोग झाला नाहीं. संकटाचे वेळीं नलाचें समाधान करण्याला आपण आतां जवळ नाहीं, यामुळें वेड्यासारखी तिची अवस्था झाली. ती शोक करीत भ्रमिष्टाप्रमाणें अरण्यांत इकडे तिकडे फिरूं लागली. ज्याच्या योगानें सरळ मनाचा नल असा दुर्दैवाच्या फेऱ्यांत सांपडला, त्याला मनांतल्या मनांत तिनें खूप शाप दिले. याप्रमाणें अरण्यांत ती भटकत असतां तिला एका अजगरानें गिळून टाकण्यास आरंभ केला. तेव्हां ती आपल्या पतीकरितां फारच शोक करूं लागली. तो तिचा आवाज जवळ असलेल्या एका पारध्यानें ऐकला. तो तत्काळ धांवत आला. त्यानें त्या अजगराला मारून दमयंतीची सुटका केली.



तिला तेथेंच एकटीला निजलेली सोडून तो चालता झाला.

[ पृ. ११८. ]

पण पुढें दमयंतीसंबंधानें त्याच्या मनांत पापबुद्धि उत्पन्न झाल्यामुळें तिनें केवळ आपल्या अब्रूचें रक्षण करण्याकरितां त्या पारध्याला शापानें जाळून टाकलें !

पुन्हा तिचें भटकणें सुरू झालें. वृक्ष, पर्वत, पशु, पक्षी, जें जें कांहीं तिला दिसे, त्याला त्याला ती आपल्या पतीची वार्ता विचारी ! असें होतां होतां एका नदीच्या तीरीं ती आली. तिथे तिला ऋषींचे कांहीं आश्रम दिसले. ती आंत गेली. ऋषींना तिनें नमस्कार केला. त्यांनीं तिची हकीकत ऐकून घेतल्यावर, नल तुला पुन्हा भेटेल व त्याचें राज्य त्याला परत मिळून तुम्ही शेवटीं सुखानें नांदाल, असा आशीर्वाद दिला. आणि ते ऋषि व आश्रम गुप्त झाले. तिला तो चमत्कार पाहून फार आश्चर्य वाटलें. पुढें तशीच ती अरण्यांतून चालली असतां तिला एक व्यापाऱ्यांचा तांडा दिसला, तेव्हां ती त्यांत जाऊन मिसळली. तिचें तें शोकानें झालेलें विचित्र रूप पाहून तिच्यासंबंधानें अनेकांचे अनेक तर्क सुरू झाले. पण त्या तांड्याचा नायक दयाळू होता;

त्यानें तिला आपल्याबरोबर येऊं दिलें. वाटेंत एका मुक्कामाला रानटी हत्तींनीं त्या तांड्याचें फार नुकसान केलें. तें नुकसान हिच्याच पायगुणामुळें झालें, असें कांहीं लोकांना वाटून ते तिला मारून टाकण्याकरितां शोधूं लागले. ती कशीबशी पळून गेली. पुन्हा ती आपलें सगळें दुर्दैव आठवून शोक करूं लागली. इतक्यांत त्याच तांड्यांतील कांहीं दयाळू ब्राह्मण तिला भेटले. त्यांच्या सोबतीनें ती चेदि देशाचा राजा सुबाहु याच्या नगरांत येऊन पोंचली. मळकें व अर्धें वस्त्र नेसलेली व वेड्यासारखी दिसणारी ती स्त्री पाहतांच रस्त्यांतील पोरांना मोठी मौज वाटून तीं तिच्यामागें लागलीं. तशा स्थितींत राजाच्या आईनें तिला पाहिलें. तिची स्थिति जरी वाईट झाली होती, तरी तिचें मूळचें रूप कायम होतें. तें विलक्षण रूप पाहून ही कोणी तरी थोर स्त्री असावी, असें राजाच्या आईला वाटलें. तिनें दासीला पाठवून तिला वाड्यांत आणविलें. व तिची हकीकत विचारली. दमयंतीनें आपलें नांवगांव लपवून तिला सगळी हकीकत सांगितली. ती ऐकून राजाच्या

आईनें तिला आपल्याजवळ ठेवून घेतलें. पण राहतांना दमयंती म्हणाली, मी कोणाचें उष्टें खाणार नाहीं, कोणाचे पाय धुणार नाहीं, किंवा ब्राह्मणाशिवाय कोणाही पुरुषाशीं भाषण करणार नाहीं; माझ्या वाटेस जाणाऱ्या पुरुषास तुम्हीं शासन केलें पाहिजे. या तिच्या पतिव्रतेला साजणाऱ्या अटी राजाच्या आईनें आनंदानें कबूल केल्या. नंतर आपल्या सुनंदा नांवाच्या मुलीला हांक मारून, हिला तूं आपल्या मैत्रिणीप्रमाणें वागीव, असें सांगितलें. अशा रीतीनें दमयंतीचे वनांतील हाल संपून ती कांहींशी सुखांत येऊन पडली.

इकडे नलराजा दमयंतीला सोडून जो निघाला, तो घोर अरण्यांतून चालला असतां एके ठिकाणीं एक मोठा पेटलेला वणवा त्याच्या दृष्टीस पडला. इतक्यांत, नलराजा धांव, असे शब्द त्याचे कानीं आले. भिऊं नको, असें उत्तर देऊन नल वणव्याकडे गेला. तों वणव्यामध्यें वेटोळें घालून पडलेला एक मोठा सर्प त्याच्या दृष्टीस पडला. तो म्हणाला, मी कर्कोटक नांवाचा नाग आहें. नारदाच्या शापामुळें मला जाग्यावरून हालवत

नाहीं. मला या वणव्यांतून काढ. मी तुझे उपकार ठेवणार नाहीं. नलानें त्याला वणव्यांतून बाहेर आणलें. व तो त्याला सोडणार इतक्यांत कर्कोटक म्हणाला, मला घेऊन कांहीं पावलें मोजीत जा व मग मला सोड. त्याप्रमाणें त्याला घेऊन नऊ पावलें त्यानें टाकलीं व दहाव्या पावलाचे वेळीं ' दश ' असें त्यानें म्हटलें. 'दश' याचे संस्कृतांत दोन अर्थ होतात,—'दहा' व 'चाव'. 'दश' म्हटल्याबरोबर तो कर्कोटक नलाला चावला. त्या विषानें नलाचें मूळचें रूप बदलून गेलें. तो काळा व कुरूप झाला. व त्याचा एक हातही लहान झाला. तें पाहून नलाला आश्चर्य वाटलें. पण कर्कोटक त्याला म्हणाला, राजा, लोकांनीं तुला ओळखूं नये, म्हणून मीं आपल्या विषानें तुझें रूप बदलून टाकिलें आहे. माझ्या विषाची बाधा तुला होणार नाहीं; पण तुझ्या शरीरांत जो कलि आहे, त्यालामात्र त्यापासून फार त्रास होईल. यापुढें तुला कोणत्याही सर्पाचें विष बाधणार नाहीं. तुला कोणाच्या शापापासून पीडा होणार नाहीं.

रणांत नेहमीं तुला यश येईल. तूं आतां अयोध्येचा राजा ऋतुपर्ण याजकडे जा. व बाहुक हें नांव धारण करून त्याचा सारथि होऊन रहा. तो अक्षविद्येंत निपुण आहे. तुला अश्वविद्या येत आहे. तूं आपली विद्या त्याला शिकीव व त्याची तूं शीक. तूं काळजी करूं नको. शेवटीं तुझें सर्व प्रकारें कल्याण होईल. आपलें पहिलें रूप प्राप्त व्हावें, असें जेव्हां तुला वाटेल तेव्हां माझें स्मरण करून हीं दोन वस्त्रें नेस. म्हणजे तुझा हेतु सफळ होईल. असें सांगून व दोन वस्त्रें नलाला देऊन तो नाग गुप्त झाला!

नंतर नल अयोध्येस ऋतुपर्णाकडे आला व म्हणाला, मी सारथि आहें. माझें नांव बाहुक. मला अश्वविद्या उत्तम येते. तेव्हां मला पदरीं ठेवावें. ऋतुपर्णानें त्याचें म्हणणें मान्य करून त्याला ठेवून घेतलें. तेथें तो राहात असतां त्याला पदोपदीं दमयंतीचें स्मरण होई. तो तिच्या आठवणी काढून रोज दुःख करीत बसे. त्याला दुःख करितांना पाहून दुसरे नोकर त्याच्या

दुःखाचें कारण विचारीत. पण कांहीं तरी सांगून तो वेळ मारून नेत असे.

पुष्करानें द्यूतांत नलाचें राज्य व सर्वस्व हरण करून घेतल्यामुळें तो व दमयंती हीं दोघें अरण्यांत निघून गेलीं, ही बातमी भीमाच्या म्हणजे दमयंतीच्या पित्याच्या कानीं गेली. तेव्हां त्यानें पुष्कळ ब्राह्मण त्यांच्या शोधाकरितां पाठविले. त्यांना त्यानें असेंही सांगितलें कीं, जो कोणी त्यांचा शोध लावून येईल, त्याला मी चांगलें इनाम देऊन त्याचें जन्माचें कल्याण करीन. ते ब्राह्मण त्यांचा शोध करीत अनेक देशांतून हिंडत होते. त्यांपैकीं सुदेव नांवाचा एक ब्राह्मण फिरत फिरत चेदिदेशाच्या राजधानींत आला. त्या ठिकाणीं राजवाड्यांत सुनंदबरोबर असलेली दमयंती त्याच्या दृष्टीस पडली. त्याला मोठा आनंद झाला. पण दुःखानें झालेली तिची अवस्था पाहून त्या आनंदांत त्याला वाईटही वाटलें. मग तिच्याजवळ जाऊन त्यानें तिला आपली ओळख दिली, व माहेरची खुशाली सांगून तुझ्याकरितां सगळी मंडळी अत्यंत शोक

करीत आहेत, असें म्हटलें. सुदेवास पाहून व त्याच्या तोंडची हकीकत ऐकून दमयंतीचा कंठ भरून आला. सुनंदेनें ही गोष्ट आपल्या आईला जाऊन सांगितली. ती लागलीच तिथे आली. सुदेवाच्या तोंडून दमयंतीची खरी हकीकत तिला कळली, तेव्हां ती आपल्या बहिणीचीच मुलगी आहे, असें तिला समजलें. मग तिला पोटाशीं धरून ती रडूं लागली. सुनंदाही तिला आलिंगन देऊन शोक करूं लागली. दुःखाचा उमाळा नाहींसा झाल्यावर दमयंतीची मावशी तिला म्हणाली, बाळे, हें तुझें माहेरच आहे, जशी माझी सुनंदा तशीच तूं. आतां येथें खुशाल रहा हें ऐकून दमयंती म्हणाली, मावशी, मी कोण हें माहीत नसतां तूं मला आश्रय देऊन अगदीं ममतेनें वागविलेंस. आतां ओळख पटल्यावर तर तूं मला फुलांत ठेवल्याप्रमाणें वागवशील हे खरें; पण माझ्या आईबाबांना व फार दिवस दूर झालेल्या माझ्या मुलांना मी केव्हां पाहीन, असें मला झालें आहे. तर मला लवकर विदर्भाला पाठ-

विण्याची तजवीज कर कशी. त्याप्रमाणें बरोबर सैन्य वगैरे देऊन तिनें दमयंतीची तिच्या पित्याकडे त्वरित रवानगी केली. दमयंती माहेरीं आल्याकर सर्वांस फार आनंद झाला. तरी पतीचा शोध नसल्यामुळें दमयंतीचें अंतःकरण दुःखानें जळतच होतें. अखेरीस भीड सोडून ती एके दिवशीं आपल्या आईला म्हणाली, आई, जर मीं जगावें, अशी तुझी इच्छा असेल, तर त्यांचा कसा तरी शोध लाव. हें आपल्या मुलीचें भाषण तिनें भीमराजाला सांगितलें. तें ऐकून राजानें नलाच्या शोधाकरितां जिकडे तिकडे दूत पाठविले. त्या दूतांना दमयंतीनें कांहीं खुणेचे श्लोक सांगून, हे जिथे जाल तिथे म्हणा व त्यांचें जो बरोबर उत्तर देईल, तो पुरुष कोणीही असो, त्याची सगळी माहिती मला येऊन कळवा, असें त्यांना बजावलें. दूत चारी बाजूंला गेले.त्यांत पर्णाद या नांवाचा एक ब्राह्मण अयोध्येला गेला. दमयंतीनें सांगितलेलीं वाक्यें उच्चारीत तो जिकडे तिकडे हिंडला. राजवाड्यांतही गेला. पण कोणाकडूनच त्याला जबाब मिळाला

नाहीं. बाहुकानेंमात्र त्याला एकांतीं गांठून व डोळ्यांत आसवें आणून त्या प्रश्नाचा योग्य जबाब दिला. तो जबाब ऐकून पर्णादानें बाहुकाची गुप्तपणें सगळी चौकशी केली, व विदर्भ देशास परत येऊन ती सर्व हकीकत दमयंतीला सांगितली. ही ऐकून दमयंतीस अर्थात् फार आनंद झाला. लागलीच मातेकडे जाऊन नलाला विदर्भदेशीं आणण्याचा एक उपाय तिनें सुचविला. भीमराजाला यांतली कांहीं बातमी पहिल्यानें द्यावयाची नाहीं, असेंही त्या मायलेकींनीं ठरविलें. त्यांनीं सुदेव ब्राह्मणास बोलावून असें सांगितलें कीं, सुदेवा, तूं सहज म्हणून अयोध्येस जा. आणि ऋतुपर्ण राजाला सांग कीं, नलराजा जिवंत आहे कीं नाहीं, याची शंका असल्यामुळें दमयंती पुन्हा स्वयंवर करणार आहे. स्वयंवराकरितां अनेक राजे विदर्भनगरींत जमले आहेत. उद्यां सकाळींच स्वयंवर आहे. इच्छा असल्यास महाराजांनीं तिकडे जावें. सुदेवानें जाऊन बरोबर बतावणी केली. तेव्हां ऋतुपर्ण बाहुकास बोलावून म्हणाला, बाहुका, दमयंती

उद्यां पुनः स्वयंवर करणार आहे. त्यासाठीं जावें, असें माझ्या मनांत आहे. तर एक दिवसांत विदर्भ देशास आपल्याला जातां येईल का? हें ऐकून नलाचें अंतःकरण अगदीं फाटून गेलें. तो मनांत म्हणाला, माझ्या शोधासाठीं तर दमयंतीनें ही युक्ति योजिली नसेल? मी तिचा मोठा अपराध केला, यांत शंका नाहीं. शिवाय पुष्कळ दिवस झाल्यामुळें तिचें माझ्यावरील प्रेमही कदाचित् नाहींसें झालें असेल! कोणीं सांगावें! आणि तसें झालें असल्यास तिनें स्वयंवरास तयार व्हावें, यांत नवल तें कोणतें? ग्यां दुष्टानें तिला कपटानें कां बरें फसवावें? पण एकदां वाटतें, दमयंती असें कधीं करणार नाहीं. यांत खरेंखोटें काय, तें तेथें गेल्याशिवाय समजणार नाहीं. तेव्हां ऋतुपर्णाचा मनोरथ पूर्ण करण्यांत माझाही फायदाच आहे. याप्रमाणें मनाशीं निश्चय केल्यावर एका दिवसांत कुंडिनपुरास जातां येईल, असें त्यानें ऋतुपर्णास सांगितलें.

पागेंतून सुलक्षणी घोडे निवडून घेऊन ते बाहुकानें रथाला जुंपले आणि ऋतुपर्ण व वार्ष्णेय

यांना रथांत बसवून त्यानें रथ सोडला. रथ वाऱ्यासारखा जात आहे, हें पाहून ऋतुपर्णाला मोठा अचंबा वाटला. जातां जातां ऋतुपर्णाच्या अंगादरील शेला खालीं पडला; तो घेण्याकरितां त्यानें रथ उभा करण्यास सांगितलें. तेव्हां बाहुक म्हणाला, महाराज, आपलें बोलणें होईपर्यंत रथ एक योजन ( आठ मैल ) दूर आला आहे. आतां शेला आणतां येणार नाहीं. तेव्हां राजानें तोंडांत बोट घातलें. कांहीं वेळानें तो म्हणाला, बाहुका, मी अक्षविद्या चांगली जाणतों, म्हणजे फांसे खेळण्यांत मी पटाईत आहें. ती विद्या मी तुला शिकवितों व तुझी अश्वविद्या मला शिकीव. त्याप्रमाणें बाहुकानें आपली विद्या ऋतुपर्णाला शिकविली व त्याची अक्षविद्या तो शिकला. बाहुकाला अक्षविद्या मिळाल्याबरोबर त्याच्या शरीरांत गुप्तपणें राहणारा कलि बाहेर पडून गेला. व तो बिब्ब्याच्या झाडाचा आश्रय करून राहिला. तेव्हांपासून तें झाड अशुभ मानण्याची चाल पडली आहे. कोंकणांत ' बिब्बा ' हा शब्द रात्रीस उच्चारीत नाहींत. त्याला ' काळा '

म्हणतात. असो. सायंकाळीं ही मंडळी कुंडिनपुरास पोंचली. भीमराजानें ऋतुपर्णाचा उत्तम आदरसत्कार केला. स्वयंवराची कांहीं गडबड नाहीं, हें पाहून त्याला आश्चर्य वाटलें. पण तो स्वस्थ राहिला. बाहुकाचा रथ जेव्हां नगरांतून राजवाड्याकडे येऊं लागला, तेव्हां त्याच्या आवाजावरून हा रथ हांकणारा नलच असला पाहिजे, असें दमयंतीनें ओळखलें. शिवाय इतक्या लांब एका दिवसांत रथ आणणारा नलावांचून दुसरा कोणी नाहीं, तेव्हां बाहुक हा नलच आहे, असें ती मनांत पक्कें समजली. पण बाहुकाचें रूप पाहून ती पुन्हा गोंधळांत पडली. पुढें बाहुकाच्या वर्तनांतील कांहीं खुब्या पाहून येण्यास तिनें आपल्या दासीला पाठविलें. त्या सर्व खुणा पटल्यावर, बाहुक हाच नल आहे, अशी तिची पक्की खात्री झाली. मग ती गोष्ट तिनें आपल्या आईबापांस कळविली. व नलाच्या रूपासंबंधानें जी शंका होती, तिचा निकाल करून घेण्याकरितां आईबापांच्या विचारानें दमयंतीनें बाहुकाला आपल्या महालांत आणविलें. एकमेकांची

नजरानजर होतांच दोघांचेही डोळे पाण्यानें भरून आले. दुःखाचा जोर कमी झाल्यावर नल म्हणाला, मीं द्यूतांत राज्य गमाविलें, अरण्यांत तुला एकटीला सोडून निघून गेलों, पुढें अनेक प्रसंग मजवर आले, हे सर्व त्या कलीचे खेळ होते. पण आतां तो सोडून गेला आहे. आतां आपलें दुःख संपलें. यावर दमयंती म्हणाली, आपण बाहुकाचे रूपानें ऋतुपर्णाचे नगरींत आहां, ही बातमी पर्णादानें येऊन सांगितल्यावर आपणांला येथपर्यंत आणण्याकरितां मीं स्वयंवराचा बहाणा केला. नाहीं तर ऋतुपर्णाला एकट्यालाच कां बरें बोलाविलें असतें? हें भाषण ऐकून दमयंतीच्या शुद्ध हेतूबद्दल नलाची खात्री झाली. मग कर्कोटकाचें स्मरण करून त्यानें दिलेलीं वस्त्रें नलानें अंगावर घेतलीं. त्याबरोबर त्याचें पहिलें रूप त्याला प्राप्त झालें. नंतर दोघें एकमेकांना प्रेमानें भेटलीं. आपल्या मुलासही त्यानें पोटाशीं कवटाळिलें.

दमयंतीच्या आईनें ही आनंदाची बातमी भीमराजाला सांगितली. सर्वांना अगदीं आनंद झाला.

नगरांत लोकांनीं मोठा उत्सव केला. ही सगळी बातमी ऋतुपर्णास कळली, तेव्हां त्यालाही संतोष वाटला. स्वयंवराची बातमी आपणासच कां कळविली, याचा उलगडा झाल्यामुळें त्याचें समाधान झालें. तेव्हां ऋतुपर्णराजा दुसरा सारथि घेऊन अयोध्येस परत गेला. नंतर एक महिनाभर तेथें राहून थोड्याशा सैन्यासह नल निषध देशाला आला. तेथें आल्यावर पुष्कराला द्यूतांत जिंकून त्यानें आपलें राज्य परत मिळविलें. पुष्कराला जिंकल्यानंतर त्याचा नाश करण्याचें जरी त्याचे हातीं होतें, तरी तो आपला भाऊ आहे, हें तो विसरला नाहीं. त्यानें त्याला खुशाल आपल्या नगराला जाऊं दिलें. मग नलानें आपलीं मुलें व दमयंती यांना तेथें आणविलें व त्यांच्यासह सुखानें काळ घालवीत पुष्कळ वर्षें राज्य केलें.

मुलांनो, नल व दमयंती यांच्या या कांहींशा लांब गोष्टीपासून आपल्याला चांगलाच बोध घेतां येण्यासारखा आहे. वैभव हें चंचल आहे. तें मिळालें तरी केव्हां कोणत्या वाटेनें निघून जाईल याचा नेम नाहीं. तेव्हां तें मिळालें

असतां मनुष्यानें फुगून जाऊं नये. अथवा तें निघून गेलें असतां आपला धीर खचूं देऊं नये. दैव जरी विपरीत झालें, व मनुष्याचे सर्व प्रयत्न जरी विफल होऊं लागले, तरी खरे थोर जे आहेत, ते मनाला वाईट वाटूं न देतां आपला सत्याचा मार्ग कधीं सोडीत नाहींत. व असा त्यांनीं मार्ग सोडला नाहीं, म्हणजे पुन्हा त्यांना चांगले दिवस येतातच येतात.

समाप्त.

